


नोंदणी क्रं. एफ.१६०९४(मुंबई)





महाराष्ट्र शासन
मराठी भाषा विभाग
**राज्य मराठी विकास संस्था**
एल्फिन्स्टन तांत्रिक विद्यालय, ३, महापालिका मार्ग,
धोबीतलाव, मुंबई - ४००००१ दूरध्वनी : (०२२) २२६३१३२५ / २२६५३९६६
संकेतस्थळ https://rmvs.marathi.gov.in इ-पत्ता rmvs_mumbai@yahoo.com

# निवेदन

महाराष्ट्र राज्याचे सांस्कृतिक धोरण २०१० अंतर्गत मराठी भाषेतील प्रतिमुद्राधिकाराची (कॉपीराइटची) मुदत संपलेले दुर्मिळ ग्रंथ महाजालावर उपलब्ध करून द्यावे असे म्हटले आहे. त्यानुसार मराठी भाषा विभागाच्या आदेशाप्रमाणे (शासननिर्णय क्र. रासांधो १०१२/ प्र. क./२०१२/भाषा-३ दि. २८ मार्च २०१३) राज्य मराठी विकास संस्थेद्वारे असे ग्रंथ आणि नियतकालिके महाजालावर उपलब्ध करून देण्याचा प्रकल्प राबवण्यात येत आहे. त्याच बरोबर प्रतिमुद्राधिकाराच्या कक्षेत येणारी काही साधनेही प्रतिमुद्राधिकारधारकांची उचित अनुमती प्राप्त झाल्यास संस्थेद्वारे संगणकीकृत करून अभ्यासकांसाठी उपलब्ध करून देण्यात येत असतात.

सदर प्रकल्पांतर्गत महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे ह्या संस्थेद्वारे प्रकाशित करण्यात येणाऱ्या महाराष्ट्र साहित्य पत्रिका ह्या नियतकालिकाच्या अंकांचे संगणकीकरण करून ते सार्वजनिकरीत्या आणि विनामूल्य उपलब्ध करून देण्यासंदर्भात उपरोक्त संस्थेला आवाहनपर विनंती करण्यात आली होती.

सदर विनंती मान्य करून महाराष्ट्र साहित्य परिषदेद्वारे सदर अंक संगणकीकरणासाठी उपलब्ध करून देण्यात आले. हे अंक सदर संस्थेच्या सहकार्यामुळेच आपल्याला संगणकीय स्वरूपात उपलब्ध होत आहेत.

या अंकांच्या पीडीएफ प्रती आपण विनामूल्य उतरवून घेऊ शकता. असे करताना खालील सूचना लक्षात घेऊन त्यांचे पालन करावे.

१. सदर ग्रंथांच्या पीडीएफ प्रती या वैयक्तिक वापरासाठी विनामूल्य उतरवून घेता येतील तसेच इतरांनाही विनामूल्य देता येतील. पण कोणत्याही कारणासाठी त्याचा व्यावसायिक वापर करता येणार नाही.
२. सदर ग्रंथांचे दुवे इतरांना देताना त्यासाठी कोणतीही रक्कम आकारता येणार नाही.
३. पीडीएफ प्रतींवर असलेली राज्य मराठी विकास संस्था, मुंबई व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांची मुद्रा आपणास काढता येणार नाही.
४. आपल्या अभ्यासासाठी, संशोधनासाठी या सामग्रीचा उपयोग करताना आपण योग्य तो श्रेयनिर्देश केला पाहिजे.
वरील अटींचा भंग झालेला आढळल्यास कायदेशीर कारवाई करण्यात येईल.

स्पष्टीकरण : सदर सामग्री ही केवळ ऐतिहासिक दस्तऐवज म्हणून उपलब्ध करण्यात आली असून या सामग्रीतून व्यक्त होणारी मते, विचारसरणी इ. त्या त्या लेखक, संपादक इ. कर्त्यांची आहे. त्यांपैकी कोणतेही मत, विचारसरणी इ. यांचा पुरस्कार महाराष्ट्र शासन, मराठी भाषा विभाग, राज्य मराठी विकास संस्था व महाराष्ट्र साहित्य परिषद, पुणे यांपैकी कुणीही करत नसून त्या त्या मताचे वा विचारसरणीचे दायित्व उपरोक्त विभागांवर/ संस्थांवर असणार नाही.

सदर अंक केवळ अभ्यासकांच्या सोयीसाठी संगणकीय स्वरूपात उपलब्ध करण्यात येत असून अंकांतील सामग्रीचे (लेखन, मांडणी, छायाचित्रे, रेखाचित्रे इ.) प्रतिमुद्राधिकार त्या त्या लेखकांकडे अथवा प्रकाशकांनी त्या त्या वेळी केलेल्या व्यवस्थेनुसार आहेत ह्याची नोंद घेण्यात यावी. त्या सामग्रीसंदर्भातील कोणतेही अधिकार वा दायित्वे राज्य मराठी विकास संस्था, मराठी भाषा विभाग किंवा महाराष्ट्र शासन ह्यांच्याकडे असणार नाहीत.

अनुक्रमणिका








## महाराष्ट्र साहित्य परिषद

**टिळक रस्ता, पुणे ४११०३०**

महाराष्ट्र साहित्य परिषदेची वार्षिक साधारण सभा रविवार, २४ जुलै १९९४ रोजी सायंकाळी ४-३० वाजता परिषदेच्या माधवराव पटवर्धन सभागृहात भरणार आहे. सर्व सभासदांनी या सभेस उपस्थित राहावे ही विनंती.

डॉ. म. वि. गोखले
कार्याध्यक्ष

अनुक्रमणिका

अनुक्रमणिका



महाराष्ट्र साहित्य परिषदेचे त्रैमासिक मुखपत्र

# महाराष्ट्र साहित्य पत्रिका

अंक २६९, एप्रिल-जून १९९४



**संपादक : वि. स. वाळिंबे**

संपादन समिती : प्रा. म. द. हातकणंगलेकर, डॉ. वि. भा. देशपांडे,
प्रा. विजय कसबेकर, हरी नरके, संतोष शेणई



**विज्ञापन समन्वयक : ह. ल. निपुणगे**



**मुखपृष्ठ : रविमुकुल**

**मलपृष्ठावरील छायाचित्र : रवीन्द्र भट**



**या अंकाची किंमत : २५ रुपये**

वार्षिक वर्गणी (संस्थांसाठी : ७५ रुपये)

आजीव सदस्य शुल्क ५०० रु., वार्षिक सदस्य शुल्क ५० रु.



मुद्रक - प्रकाशक : डॉ. गं. ना. जोगळेकर, प्रमुख कार्यवाह,
महाराष्ट्र साहित्य परिषद, टिळक रस्ता,
पुणे ४११ ०३०. (दूरभाष : ४४२९६३)
मुद्रणस्थळ : स्मिता प्रिंटर्स, १०१९, सदाशिव पेठ, पुणे ४११ ०३०.

अनुक्रमणिका

# अंतरंग

## संपादकीय

महाराष्ट्र साहित्य परिषदेचा ८८ वा वर्धापनदिन गेल्या २७ मे रोजी परिषदेचे उपाध्यक्ष श्री. ना. सं. इनामदार यांच्या अध्यक्षतेखाली साजरा करण्यात आला. या प्रसंगी प्रमुख पाहुणे म्हणून ज्येष्ठ साहित्यिक श्री. व्यंकटेश माडगूळकर उपस्थित होते.

साहित्यसृष्टीमध्ये दीर्घकाळ वावरलेल्या आणि आपल्या दर्जेदार कर्तृत्वाने त्या क्षेत्रावर आपली स्वतंत्र मुद्रा उमटविलेल्या ज्येष्ठ व्यक्तीचा या वर्धापन दिनाच्या निमित्ताने परिषदेच्या वतीने सत्कार करण्यात येतो. तीन हजार रुपये आणि मानचिन्ह अशा या गौरवाचे स्वरूप असते. या पुरस्कारासाठी या वर्षी श्रीमती वसुंधरा पटवर्धन यांची निवड करण्यात आली होती. १९५० ते १९८० हा वसुंधराबाईंचे लेखन विशेष बहराला आलेला कालखंड. या तीस वर्षांच्या कालावधीत वसुंधराबाईंची जवळजवळ तीस पुस्तके प्रसिद्ध झाली. यांत कादंबरी, नाटके, प्रवासवर्णन, लघुनिबंध अशा अनेक साहित्यप्रकारांचा समावेश असला, तरी वसुंधराबाई मुख्यतः ओळखल्या जातात त्या कथालेखिका म्हणून. त्यांच्या तीस पुस्तकांपैकी वीस पुस्तके कथासंग्रहांची आहेत, यावरून हे स्पष्ट होते. नागर मध्यमवर्गीय स्त्रीजीवनाचे प्रत्ययकारी दर्शन वसुंधराबाईंच्या कथा समर्थपणे घडवितात. त्यामुळे त्यांच्या कथांना स्वतंत्र वाचकवर्ग लाभू शकला.

सत्काराला उत्तर देताना केलेल्या भाषणामध्ये वसुंधराबाईंनी लेखनामागची आपली भूमिका विशद केली. साहित्याने आपल्याला काय दिले यासंबंधी बोलताना 'लेखनामुळे आपल्याला आनंद, जगण्यासाठी आधार आणि आवश्यक असलेला आत्मविश्वास लाभला,' असे त्यांनी कृतज्ञपणे नमूद केले.

प्रत्यक्ष जीवनानुभव आणि त्याचा कलाविष्कार यामध्ये कोणती प्रक्रिया गुंतलेली असते, अनुभवाचे आविष्कारामध्ये रूपांतर घडवून आणताना त्यात कसे बदल होत जातात यासंबंधी श्री. व्यंकटेश माडगूळकर यांनी आपल्या दोन कथांच्या संदर्भात विवेचन केले.

साहित्यक्षेत्रामध्ये बराच काळ निरलस वृत्तीने कार्य करणाऱ्या साहित्यसेवकाचा वर्धापन दिनी डॉ. भीमराव कुलकर्णी पुरस्कार देऊन गौरव करण्यात येतो. आंध्र प्रदेश मराठी साहित्य परिषदेचे कार्यवाह श्री. द. पं. जोशी या वर्षीच्या पुरस्काराचे मानकरी ठरले.

### 'आर्याकारां'ची द्विस्मृतीशताब्दी

कविवर्य मोरोपंतांचे नाव निघाले की, लगेच आठवतात त्या त्यांच्या अनेकांना मुखोद्गत असलेल्या आर्या. त्यामुळे मोरोपंत आर्याकार या अभिधानानेच ओळखले जातात. मोरोपंतांनी लिहिलेल्या पदांची संख्या पन्नास ते साठ हजार असावी, असा संशोधकांचा कयास आहे.



अनुक्रमणिका






केवळ विपुल काव्यरचना एवढ्यापुरते मोरोपंतांचे महत्त्व मर्यादित नाही. मोरोपंतांच्या आर्यांनी त्याचप्रमाणे महाभारत आणि रामायण या ग्रंथांवर आधारलेल्या त्यांच्या कथाकाव्यांनी रसिक मराठी मनाला प्रभावित केले. शुद्ध भाषेसंबंधीची जागरूकता वाङ्मयाबाबतच्या अभिरुचीमध्ये महत्त्वाचा घटक ठरते, याची आर्याकारांना जाण होती आणि त्यामुळे त्यांनी काव्यरचना करताना या बहिरंगाकडे कटाक्षाने लक्ष दिल्याचे जाणवते.

२५ एप्रिल १७९४ या दिवशी मोरोपंतांचे देहावसान झाले. त्यामुळे गेल्या २५ एप्रिलला त्यांची द्विस्मृतीशताब्दी पाळण्यात आली. या निमित्ताने मोरोपंतांच्या लेखनगुणांसंबंधी अनेक अभ्यासकांनी लेखरूपाने वा व्याख्यानरूपाने मीमांसा करून त्यांच्या काव्यकर्तृत्वाला श्रद्धांजली वाहिली.

मराठी साहित्याची सध्याची अवस्था असमाधानकारक असल्याचे आपले परखड मत संपादन, समीक्षण आणि प्रकाशन या क्षेत्रांमध्ये चिंतनशीलतेमुळे वैशिष्ट्यपूर्ण स्थान मिळविणारे श्री. श्री. पु. भागवत यांनी अलीकडेच सौम्य शब्दांत परंतु नेमकेपणाने व्यक्त केले. निमित्त होते कोकण मराठी साहित्य संमेलनाचे. ठाणे जिल्ह्यातील केळवे येथे भरलेल्या या संमेलनाच्या अध्यक्षपदावरून बोलताना श्री. पुं. नी १९४५ पासून अवतरलेल्या युगान्तराची विशेषता विशद करून आज ती परिस्थिती राहिलेली नसल्याबद्दल आपले असमाधानही नोंदवले.

पूर्वीची रोमांचकारी स्थिती मराठी साहित्याच्या निर्मितीच्या काय किंवा आस्वादाच्या क्षेत्रात काय आज राहिलेली नाही, असे सांगून श्री. पु. भागवत यांनी आपली व्यथा पुढील शब्दांमध्ये प्रकट केली :

'एखादी कथा, कविता वा पुस्तक वाचून माणसे आजकाल नादावून जात नाहीत. वेड्यासारखी काळाचे भान विसरून त्याची चर्चा करत बसत नाहीत. नव्या पुस्तकांवर पूर्वीसारख्या तावलेल्या चर्चा होत नाहीत. वृत्तपत्रांमधून उलटसुलट मतांचे वाद झडत नाहीत. गेल्या काही वर्षांमध्ये जगभरच साहित्याला दूरदर्शनसारख्या प्रभावी दृक्-श्राव्य माध्यमाला तोंड द्यावे लागत आहे आणि सुरुवातीला तरी ही विषम लढाई साहित्य हरत असल्याचे दिसून येत आहे. परंतु जगाचा अनुभव ध्यानात घेतला तर पाचपन्नास वर्षे उशिरा का होईना, भौतिक विकासाबरोबर आत्म्याची भूक भागविणाऱ्या साहित्याकडे आपली माणसे पुन्हा वळू लागतील अशी आशा आहे. पण हा पुढचा विचार झाला. आज तर मराठी साहित्य राहोच, पण मराठी भाषा तरी टिकेल की नाही आणि टिकली तर कोणत्या स्वरूपात टिकेल, याचीच शंका माझ्यासारख्या चिंतातुर स्वभावाच्या भाषाप्रेमिकांना भेडसावते.'

मराठी भाषा आणि साहित्य यांच्या भवितव्याविषयी गंभीरपणे विचार करणाऱ्यांनी अवश्य दखल घ्यावी, असा इशारा श्री. पु. भागवत यांनी दिलेला आहे. मराठी साहित्याला आजची अवस्था का प्राप्त झाली, तसे होण्याला जबाबदार कोण यासंबंधी मतभिन्नता

संभवते. परंतु गेल्या काही वर्षांमध्ये मराठी वाङ्मय अपेक्षित असलेली उंची गाठू शकलेले नाही, ही वस्तुस्थिती मान्य करायला हवी.

**अभिनंदन**

मराठीचे ख्यातनाम प्राध्यापक आणि चरित्रग्रंथांचे लेखक डॉ. द. न. गोखले यांना पुणे विद्यापीठाने नुकतीच डॉक्टर ऑफ लेटर्स ही सर्वोच्च पदवी प्रदान केली आहे.

क्रांतिवीर बाबाराव सावरकर यांच्या चरित्राने डॉ. गोखले यांनी आपल्या चरित्रलेखनाला प्रारंभ केला. त्यानंतर त्यांनी ज्ञानकोशकार श्रीधर व्यंकटेश केतकर, स्वातंत्र्यवीर सावरकर आणि कविवर्य माधव ज्युलियन यांची चरित्रे लिहिली. या प्रत्येक चरित्रग्रंथाने डॉ. गोखले यांच्या सखोल व्यासंगाचा आणि चिकित्सक विवेचनाचा प्रत्यय घडवून आणला. त्यांनी अलीकडेच महात्मा गांधी यांच्या चरित्राचे लेखन पूर्ण केले आहे.

'डॉ. माधवराव पटवर्धन ऊर्फ माधव ज्युलियन' या ग्रंथाबद्दल आणि या ग्रंथाची निर्मिती-प्रक्रिया कथन करणाऱ्या 'एका चरित्राचे चरित्र' या ग्रंथाबद्दल डॉ. गोखले यांना डॉक्टर ऑफ लेटर्स हा बहुमान देण्यात आलेला आहे.

या गौरवाबद्दल डॉ. द. न. गोखले यांचे अभिनंदन.

महाराष्ट्र साहित्य परिषदेचे कार्यकारी विश्वस्त श्री. म. श्री. दीक्षित यांनी २२ मे रोजी एकाहत्तराव्या वर्षात पदार्पण केले, या निमित्ताने त्यांचेही अभिनंदन.

म. श्री. दीक्षित यांनी साहित्य परिषदेत प्रवेश केला तो एक साधे कारकून म्हणून. परंतु साहित्याविषयीच्या आवडीमुळे त्यांनी या कामाकडे केवळ नोकरी म्हणून कधी पाहिलेच नाही. ज्येष्ठ साहित्यिकांशी परिचित होण्याची संधी या भावनेनेच श्री. दीक्षित साहित्य परिषदेच्या कारभारामध्ये लक्ष घालीत असत. कालांतराने त्यांनी या नोकरीचे त्यागपत्र दिले, तरीही साहित्यपरिषदेबरोबरचा त्यांचा संबंध आजपावेतो अतूट राहिला आहे. ते काही काळ परिषदेचे पदाधिकारी झाले, आणि अलीकडे ते कार्यकारी विश्वस्त म्हणून काम पाहत आहेत.

म. श्री. दीक्षित यांना म. म. द. वा. पोतदार आणि कै. बापूसाहेब माटे यांचा सहवास लाभला. पोतदारांमुळे दीक्षित यांना सार्वजनिक कार्याची प्रेरणा मिळाली आणि सध्या ते साहित्य परिषदेप्रमाणे, पुणे नगर वाचन मंदिर, वसंत व्याख्यानमाला, भारत इतिहास संशोधक मंडळ, बाजीराव स्मारक समिती अशा अनेक संस्थांशी निगडित आहेत. माटे यांच्या मार्गदर्शनामुळे दीक्षित ग्रंथलेखनाकडे वळले. मराठेशाहीचा इतिहास हा दीक्षितांचा आवडता विषय असल्यामुळे त्यांनी या कालखंडातील अनेक नरवीरांची चरित्रे लिहिली आहेत. थोरले बाजीराव पेशवे आणि नेपोलियन यांची म. श्री. दीक्षित यांनी लिहिलेली चरित्रे विशेष गाजली. म. श्री. दीक्षित यांचा या वयातील सार्वजनिक कार्यासंबंधीचा उत्साह खरोखरच वाखाणण्याजोगा आहे.

**चालत्या-बोलत्या ज्ञानपीठाचा अस्त**

वेदवाङ्मयाचे आंतरराष्ट्रीय ख्यातीचे गाढे अभ्यासक, श्रेष्ठ तत्त्वज्ञ आणि प्रकांडपांडित्य संपादन केलेले विचारवंत तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे २७ मे रोजी निधन झाले. शास्त्रीजींना ९३ वर्षांचे आयुर्मान लाभले. त्यामुळे त्यांचे देहावसान अकाली म्हणता येणार नाही; परंतु ते आकस्मिक होते आणि त्यामुळे त्यांच्या देहावसानाचे वृत्त कळताच सारा महाराष्ट्र हळहळला. कारण शास्त्रीजींच्या रूपाने महाराष्ट्राने गेली सहा-सात दशके एक चालते-बोलते ज्ञानपीठ पाहिले होते, अनुभवले होते. शास्त्रीजींच्या चिकित्सक बुद्धीला कोणताही विषय अगम्य नसायचा. त्यामुळे त्यांचे प्रत्येक व्याख्यान काही ना काही नवे देऊन जात असे.

शास्त्रीजींना दिगंत कीर्ती लाभली. अनेक दुर्मिळ मानसन्मान मिळाले. परंतु सदैव ज्ञानयोग्याच्या साधेपणानेच त्यांनी आपले सारे जीवन व्यतीत केले. शास्त्रीजींचा अनेक संस्थांशी निकटचा संबंध आला; परंतु ते विशेष रमले ते धर्मकोश आणि विश्वकोश यांच्या निर्मितीत.

'वैदिक संस्कृतीचा विकास' या शास्त्रीजींच्या ग्रंथाला साहित्य अकादमीचा पुरस्कार लाभला. १९५४ मध्ये दिल्ली येथे भरलेल्या अखिल भारतीय मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्षपद त्यांनी भूषविले.

महाराष्ट्र साहित्य परिषदेशी शास्त्रीजींचा दीर्घकाळ हार्दिक संबंध होता. साहित्य परिषदेच्या विश्वस्तपदाची जबाबदारीही त्यांनी बरीच वर्षे सांभाळली.

मराठी नाट्यसमीक्षेला तात्त्विक आणि वैचारिक अधिष्ठान प्राप्त करून देणारे ज्येष्ठ समीक्षक श्री. माधव मनोहर यांचे १६ मे रोजी मुंबई येथे देहावसान झाले. ते ८३ वर्षांचे होते.

मुंबईतील श्रीमती नाथीबाई दामोदर ठाकरसी विद्यापीठात मराठीचे प्राध्यापक म्हणून माधव मनोहर यांनी आपल्या जीवनकार्याला प्रारंभ केला. 'ज्वाला' ही त्यांची कादंबरी खूपच गाजली. त्यानंतर त्यांनी 'अन्नदाता', 'एक आणि दोन', 'एका रात्रीची गोष्ट' आणि 'किल्ली' या अनुवादित कादंबऱ्या लिहिल्या. या ग्रंथलेखनाबरोबरच अनेक वृत्तपत्रांत माधव मनोहर नियमित स्तंभलेखन करीत. त्यांचे हे सारेच लिखाण त्यांच्या व्यासंगाची साक्ष देणारे ठरले. परंतु माधव मनोहर विशेष ओळखले जाऊ लागले ते त्यांच्या परखड नाट्यसमीक्षेमुळे. सातारा येथे भरलेल्या नाट्यसंमेलनाच्या अध्यक्षपदी त्यांची निवड करण्यात आली होती.

तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी आणि प्रा. माधव मनोहर यांच्या स्मृतीला विनम्र अभिवादन.

– वि. स. वाळिंबे

**डॉ. वसंत स. जोशी**

# विनोदाच्या काहण्या

मद्रास युनिव्हर्सिटीच्या आवारात असणारी 'गव्हर्नमेंट ओरिएण्टल मॅन्युस्क्रिप्ट लायब्ररी' ही पोथीशाळा संस्कृत, तमिळ, तेलुगू, मराठी इत्यादी भाषांतील हस्तलिखितांनी समृद्ध बनली आहे. कर्नल मेकेन्झी या ईस्ट इंडिया कंपनीच्या सर्वेयर जनरलने त्यातील मराठी हस्तलिखितांचा संग्रह करण्यासाठी खूप परिश्रम घेतले.[१] प्राच्यविद्या हा त्याच्या आवडीचा विषय होता. पुणे या पेशव्यांच्या राजधानीत कारणपरत्वे त्याचे येणे-जाणे होई. त्या वेळी तेथून कित्येक मराठी हस्तलिखितांच्या नकला त्याने करवून घेतल्या; उदाहरणार्थ, 'भोसले व पेशवे यांचे बखर'. या बखरीच्या शेवटी पुढीलप्रमाणे नोंद करण्यास आली आहे– 'ही बखर बच्योवा पैठणकर हाली वस्ति पुणे याजकडून प्रती लिहिले ते मुतसद्दि नारायणराव व आनंदराव इलाखे मजेर कालेन मकांजीसाहेब सुपरींटेंनड्यांट आफ दि मैसुर (superintendet of the Mysore) बा तारीख २५ माहे जुलाई सन १८०७ इसवि दर जागा मुलामुठा नदि संगम मुतसिल पुना.' यावरून कर्नल मेकेन्सी याच्यासाठी नारायणराव आणि आनंदराव या दोन कारकुनांनी किंवा लेखनिकांनी बचोबा पैठणकर यांच्याकडील मूळ हस्तलिखितावरून, पुणे येथील मुळा-मुठा नदीसंगमावरील इंग्रजांच्या छावणीत ही प्रत तयार केल्याचे स्पष्ट होते. इतिहास, भूगोल, भाषा, साहित्य, विज्ञान, तत्त्वज्ञान इत्यादी विषयांचे कुतूहल या ज्ञानपिपासू इंग्रज अधिकाऱ्यांना होते. डॉ. लेडन हे भाषावैज्ञानिक आणि मि. ब्राऊन हे इंग्रज अधिकारी यांनीही या संग्रहात मोलाची भर टाकलेली आहे. मराठी हस्तलिखितांत काही ऐतिहासिक बखरी, भाषा व व्याकरणविषयक ग्रंथ, दक्षिणेतील मराठी राज्यकर्त्यांचा पत्रव्यवहार यांचा समावेश आहे. ज्ञानसंग्रह आणि रंजन हे या संग्रहाच्या मागील हेतू असावेत.

**आगळे हस्तलिखित**

जानेवारी १९९३ मध्ये मी मद्रासमधील माझ्या वास्तव्यात या पोथीशाळेतील मराठी हस्तलिखितांचा धांडोळा घेतला. 'विनोदाच्या काहण्या' या शीर्षकाच्या मोडी लिपीतील एका हस्तलिखिताने माझे लक्ष वेधून घेतले. एकूण तीस पृष्ठांचे हे हस्तलिखित असून त्यातील प्रत्येक पृष्ठात आठ ते दहा ओळी आहेत. पृष्ठाच्या मागील बाजूस आकडे घातलेले नाहीत, त्यामुळे हे हस्तलिखित ६० पृष्ठांचे म्हणता येईल. त्याचा क्रमांक

Marathi No. 38 असा नोंदला आहे. मूळ मराठी मजकुरावर 'विनोदाच्या काहण्या' असे शीर्षक असले तरी आवरणपृष्ठावर इंग्लिशमध्ये 'Maharata History in Pleasing Tales' असे शीर्षक देण्यात आले आहे. या मोडी हस्तलिखिताची झेरॉक्स प्रत मी मद्रास युनिव्हर्सिटीच्या ग्रंथालयात करवून घेतली आणि नंतर देवनागरीत तिचे लिप्यंतर केले.[२]

कर्नल मेकेन्झी हा सन १७८२ मध्ये भारतात आला आणि १८२१ मध्ये त्याचे देहावसान झाले. या चाळीस वर्षांच्या कालखंडात त्याने हा संग्रह जमविला. यातील कित्येक हस्तलिखिते मूळ रूपात आहेत, तर काहींच्या नकला मराठी पंडितांकडून करवून घेतलेल्या दिसतात. या संग्रहातील 'विनोदाच्या काहण्या' या हस्तलिखिताच्या कर्त्याची त्यात नोंद नाही. त्यातील कथांचे किंवा कहाण्यांचे स्वरूप लोककथात्मक किंवा पारंपरिक आहे. कर्नल मेकेन्झी याच्या काळात रंजनासाठी या कथा लिहवून घेतल्या असल्या पाहिजेत. रंजन आणि उद्‍बोधन ही या कहाण्यांची वैशिष्ट्ये आहेत. त्यांच्या लेखनात पारंपरिक कहाण्यांचा लडिवाळ ढंग नाही. छोटी छोटी लयबद्ध वाक्यरचना नाही. त्यांच्या भाषेचे स्वरूप अठराव्या शतकाच्या अखेरील तंजावरी मराठीचे आहे. मराठी गद्याचा इंग्रजी अवतार होण्यापूर्वी त्यांचे लेखन झाले. त्यामुळे इंग्रजी भाषेचा (वा साहित्याचा) स्पर्श न झालेली पण खास तंजावरी ढंगाची भाषा या कहाण्यांतून वाचावयास मिळते. भाषाभ्यासकांना आवडेल असा हा दस्तऐवज आहे. इंग्रजीचा प्रभाव नसला तरी संस्कृत आणि अरबी-फारशी शब्दांची योजना त्यात जरूर आहे. इंग्रजपूर्वकालीन राज्यव्यवहाराशी परिचित अशा व्यक्तींनी त्याचे लेखन केल्यामुळे कदाचित तो प्रभाव राहिला असावा.

### 'विनोदा'च्या काहण्या

प्रस्तुत हस्तलिखिताचे शीर्षक 'विनोदाच्या काहण्या' असे असल्यामुळे मी त्याच्याकडे आकर्षिला गेलो. तथापि त्याचे मुळातून वाचन करताना त्या कहाण्या बोधप्रद आणि रंजक स्वरूपाच्या कथा असल्याचे आढळून आले. त्याचे इंग्रजी रूपांतरही Pleasing Tales असे करण्यात आलेले आहे. विद्यमान मराठी साहित्यात लोकप्रिय असलेल्या 'विनोदी' (Humorous) कथांसारखे त्यांचे स्वरूप नाही. स्वाभाविकपणेच अठराव्या शतकात 'विनोद' हा शब्द 'रंजन' या अर्थाने आणि 'विनोदी' हा शब्द 'रंजक' या अर्थाने वापरला जात असल्याचे स्पष्ट झाले. त्यामुळे 'विनोद' या शब्दाचा 'रंजन' हा मूळ अर्थ बदलत जाऊन 'हास्य' किंवा 'हास्यकारक' या अर्थाने त्याचे स्थित्यंतर किंवा अर्थांतर कसे झाले असावे, याची जिज्ञासा निर्माण झाली.

### विनोद : रंजनाकडून हास्याकडे

मनोविनोदन म्हणजेच मनोरंजन ही मानवाची स्वाभाविक प्रवृत्ती आहे. अनेक

कलाप्रकारांचा जन्म रंजनहेतुप्रधान असल्याचे दिसून येते. आनंदनिर्मिती हे त्यांचे अंतिम प्रयोजन असते. बुद्धिमंतांचा काळ काव्यशास्त्रविनोदात व्यतीत होतो.[३] बौद्धिक व्यवहारानंतर काही काळाचे रंजनही आवश्यक असते. म्हणजेच विशिष्ट कष्टकारक, उद्वेगजनक किंवा मनोमालिन्य आणणाऱ्या विषयांपासून चित्त अन्यत्र वळविण्यासाठी विनोदाची म्हणजे रंजनाची गरज असते. मूर्खांचा काळ मात्र व्यसन, निद्रा किंवा कलह यात व्यतीत होतो, असे सुभाषितकाराचे मत आहे.

विनोद या शब्दाचे वेगवेगळे अर्थ कोशकारांनी दिलेआहेत. कृ. पां. कुलकर्णी त्याचा अर्थ 'आनंद, थट्टा, गंमत' असा देतात.[४] तर जनार्दन विनायक ओक त्याचे घालविणे, श्रमपरिहार, क्रीडा, मनोरंजन, शोकपरिहार, कौतुहल असे अर्थ सांगतात.[५] रघुनाथ भास्कर गोडबोले यांच्या मते कौतुक, चमत्कार असा त्याचा अर्थ आहे.[६] वा. शि. आपटे यांनी To divert, amuse असे अर्थ देऊन 'शाकुंतला'तील पुढील उदाहरण दिले आहे : 'वच नु खलु आत्मानं विनोदयामि। लतासु दृष्टिं विनोदयामि।'[७] मोल्सवर्थ आपल्या कोशात 'विनोदा'च्या अर्थाची पुढीलप्रमाणे नोंद करतो.[८] 1. Start, play, diversion, pastime, sporting or playing. 2. Justing, joking इत्यादी. या सर्व कोशगत अर्थामध्ये आज प्रचलित असलेल्या 'हास्य' या अर्थाची छटा असलेला कोणताही शब्द दिसत नाही, हे लक्षणीय आहे.

## 'टवाळा आवडे विनोद'

या संदर्भात समर्थ रामदासांची 'टवाळा आवडे विनोद' ही उक्ती समोर येते आणि रामदासांना विनोदाचे वावडे होते असा तिचा अर्थ केला जातो. वास्तविक रामदासांच्या प्रस्तुत चरणातच विनोदाचे स्वरूप दडलेले आहे. टवाळाला आवडणारा विनोद म्हणजे टवाळकी, टर किंवा टिंगल या विनोदाचे म्हणजेच रंजनाचे स्वरूप ग्राम्य, बाष्कळ किंवा थिल्लर असणार. उच्च दर्जाचा विनोद म्हणजे रंजन प्रकार येथे नसल्याचे रामदासांना सूचित करावयाचे आहे. भारतीय साहित्यशास्त्रातील नवरसात 'हास्य' हा महत्त्वाचा रस आहे. (हिन्दी साहित्यात 'हास्यकार' असा शब्द उपयोजिला जातो. हास्य या अर्थी 'व्यंग्य' आणि विनोदी कवीस 'व्यंग्य कवी' असे शब्द तेथे रूढ आहेत. मराठी सदृश अर्थाचा 'विनोद' किंवा 'विनोदी' असा शब्द प्रचलित नाही.) 'हास्य' रसाचा स्थायीभाव 'हास' आहे. विनोद नाही. टवाळाला आवडणारा विनोद ही एक विशिष्ट सांस्कृतिक पातळी रामदासांनी दाखविली आहे. भारतीय नाट्यशास्त्र प्रस्थापित करणाऱ्या भरतमुनींनी स्मित, हसित, विहसित, उपहसित, अपहसित आणि अतिहसित असे हास्याचे सहा प्रकार सांगितले आहेत. यातील स्मित आणि हसित हे उत्तम प्रतीचे, विहसित आणि उपहसित हे मध्यम प्रतीचे आणि अपहसित व अतिहसित हे नीच प्रतीचे हास्य प्रकार मानले आहेत. रामदासांचा रोख



अनुक्रमणिका






टवाळांना आवडणाऱ्या अपहसित आणि अतिहसित या हास्यप्रकारांकडे आहे. आचार्य प्र. के. अत्रे यांनीही विनोद स्वतः वाईट नाही, पण त्याचे नातेवाईक वात्रटपणा, गावंढळपणा, चावटपणा, ग्राम्यता, अश्लीलता आणि बीभत्सपणा यासारखे फार असल्याचे म्हटले आहे.[९] रामदासांनीच हास्यस्वरूपाच्या करमणुकीत रमणारा तो 'रजोगुणी' असल्याचे स्पष्टपणे सांगितले आहे. (टवाळी ढवाळी निंदा। सांगणे घडे विवादा। हास्यविनोद करी सर्वदा। ती रजोगुण॥) 'धन्य तें गायनी कळा' म्हणणारे रसिक रामदास उच्च प्रतीच्या हास्याची अपेक्षा करीत असतील, तर ते योग्यच होय. टवाळा आवडे विनोद या उक्तीतील गर्भितार्थ लक्षात न घेता, रामदास हास्याचे वावडे असणारे अरसिक होते, असे सुचविणे म्हणजे त्यांच्यावर अन्याय करणे होय.

### मानसिक ताण दूर करणारा विनोद

विनोद या शब्दाचा दुसरा एक अर्थ वि + नुद् म्हणजे दूर करणे To set aside हाही महत्त्वाचा आहे. ज. वि. ओक यांनी 'घालविणे, श्रमपरिहार, शोकपरिहार' असे आणि वा. शि. आपटे यांनी 'To divert, removing, driving away, श्रमविनोद, A diverstion' असे अर्थ आपापल्या कोशातून दिले आहेत.[१०] रा. श्री. जोग यांनी मनाला आलेला शीण दूर सारण्यास ज्याचा उपयोग होतो तो विनोद हा त्याचा स्वाभाविक अर्थ असल्याचे सांगितले आहे.[११] मनाला आलेला कंटाळा, उद्वेग, शीण दूर सारणारा रंजन प्रकार तो विनोद असे यावरून म्हणता येईल. बौद्धिक वा अन्य कार्याने आलेला शिणवटा, काही कारणांनी आलेला मानसिक तणाव दूर करून, विनोद हा रंजनप्रकार मनुष्याला ताणविरहित आणि ताजातवाना बनवितो. कारुण्य आणि हास्य यांचा अन्योन्यसंबंध याच दृष्टीने पाहावा लागेल. मनाला स्थिर व शांत बनवून समधातता प्राप्त करून देण्यास विनोद हा रंजनप्रकार साहाय्यकारी होतो.

### केळकरांची 'हास्यविनोद मीमांसा'

उच्च प्रतीचा वाङ्मयीन हास्यविनोद या अर्थाने जुन्या मराठी साहित्यात निश्चित शब्द आढळत नाही. महानुभाव साहित्यात रळी-राजमळी असे शब्द योजले असले तरी ते थट्टा-मस्करी या अर्थाचे समानार्थक जोडशब्द आहेत. मोल्सवर्थने आपल्या कोशात विनोद या अर्थाने दिलेले joking, jesting, bantering किंवा ralluing हे सर्व शब्द, थट्टा, मस्करी, गंमत याच अर्थाचे आहेत. त्यात साहित्यिक विनोदाचा अंतर्भाव नाही. प्रस्तुत मोडी हस्तलिखितात विनोद हा शब्द रंजन या अर्थी वापरण्यात आलेला आहे. ('आळशी पुरुष विनोद यैशा कामाते अनुसरतो'– कहाणी ८ वी)

मराठीमध्ये हास्यविनोदाची पहिली मीमांसा नं. चि. केळकर यांनी केली. श्री. कृ. कोल्हटकरांचा 'साक्षीदार' या 'विविधज्ञानविस्तारा'त प्रसिद्ध झालेला लेख म्हणजे



अनुक्रमणिका

Marathi No. 38 असा नोंदला आहे. मूळ मराठी मजकुरावर 'विनोदाच्या काहण्या' असे शीर्षक असले तरी आवरणपृष्ठावर इंग्लिशमध्ये 'Maharata History in Pleasing Tales' असे शीर्षक देण्यात आले आहे. या मोडी हस्तलिखिताची झेरॉक्स प्रत मी मद्रास युनिव्हर्सिटीच्या ग्रंथालयात करवून घेतली आणि नंतर देवनागरीत तिचे लिप्यंतर केले. [२]

कर्नल मेकेन्झी हा सन १७८२ मध्ये भारतात आला आणि १८२१ मध्ये त्याचे देहावसान झाले. या चाळीस वर्षांच्या कालखंडात त्याने हा संग्रह जमविला. यातील कित्येक हस्तलिखिते मूळ रूपात आहेत, तर काहींच्या नकला मराठी पंडितांकडून करवून घेतलेल्या दिसतात. या संग्रहातील 'विनोदाच्या काहण्या' या हस्तलिखिताच्या कर्त्याची त्यात नोंद नाही. त्यातील कथांचे किंवा कहाण्यांचे स्वरूप लोककथात्मक किंवा पारंपरिक आहे. कर्नल मेकेन्झी याच्या काळात रंजनासाठी या कथा लिहवून घेतल्या असल्या पाहिजेत. रंजन आणि उद्‌बोधन ही या कहाण्यांची वैशिष्ट्ये आहेत. त्यांच्या लेखनात पारंपरिक कहाण्यांचा लडिवाळ ढंग नाही. छोटी छोटी लयबद्ध वाक्यरचना नाही. त्यांच्या भाषेचे स्वरूप अठराव्या शतकाच्या अखेरील तंजावरी मराठीचे आहे. मराठी गद्याचा इंग्रजी अवतार होण्यापूर्वी त्यांचे लेखन झाले. त्यामुळे इंग्रजी भाषेचा (वा साहित्याचा) स्पर्श न झालेली पण खास तंजावरी ढंगाची भाषा या कहाण्यांतून वाचावयास मिळते. भाषाभ्यासकांना आवडेल असा हा दस्तऐवज आहे. इंग्रजीचा प्रभाव नसला तरी संस्कृत आणि अरबी-फारशी शब्दांची योजना त्यात जरूर आहे. इंग्रजपूर्वकालीन राज्यव्यवहाराशी परिचित अशा व्यक्तींनी त्याचे लेखन केल्यामुळे कदाचित तो प्रभाव राहिला असावा.

### 'विनोदा'च्या काहण्या

प्रस्तुत हस्तलिखिताचे शीर्षक 'विनोदाच्या काहण्या' असे असल्यामुळे मी त्याच्याकडे आकर्षिला गेलो. तथापि त्याचे मुळातून वाचन करताना त्या कहाण्या बोधप्रद आणि रंजक स्वरूपाच्या कथा असल्याचे आढळून आले. त्याचे इंग्रजी रूपांतरही Pleasing Tales असे करण्यात आलेले आहे. विद्यमान मराठी साहित्यात लोकप्रिय असलेल्या 'विनोदी' (Humorous) कथांसारखे त्यांचे स्वरूप नाही. स्वाभाविकपणेच अठराव्या शतकात 'विनोद' हा शब्द 'रंजन' या अर्थाने आणि 'विनोदी' हा शब्द 'रंजक' या अर्थाने वापरला जात असल्याचे स्पष्ट झाले. त्यामुळे 'विनोद' या शब्दाचा 'रंजन' हा मूळ अर्थ बदलत जाऊन 'हास्य' किंवा 'हास्यकारक' या अर्थाने त्याचे स्थित्यंतर किंवा अर्थांतर कसे झाले असावे, याची जिज्ञासा निर्माण झाली.

### विनोद: रंजनाकडून हास्याकडे

मनोविनोदन म्हणजेच मनोरंजन ही मानवाची स्वाभाविक प्रवृत्ती आहे. अनेक










कलाप्रकारांचा जन्म रंजनहेतुप्रधान असल्याचे दिसून येते. आनंदनिर्मिती हे त्यांचे अंतिम प्रयोजन असते. बुद्धिमंतांचा काळ काव्यशास्त्रविनोदात व्यतीत होतो.[३] बौद्धिक व्यवहारानंतर काही काळाचे रंजनही आवश्यक असते. म्हणजेच विशिष्ट कष्टकारक, उद्वेगजनक किंवा मनोमालिन्य आणणाऱ्या विषयांपासून चित्त अन्यत्र वळविण्यासाठी विनोदाची म्हणजे रंजनाची गरज असते. मूर्खांचा काळ मात्र व्यसन, निद्रा किंवा कलह यात व्यतीत होतो, असे सुभाषितकाराचे मत आहे.

विनोद या शब्दाचे वेगवेगळे अर्थ कोशकारांनी दिलेआहेत. कृ. पां. कुलकर्णी त्याचा अर्थ 'आनंद, थट्टा, गंमत' असा देतात.[४] तर जनार्दन विनायक ओक त्याचे घालविणे, श्रमपरिहार, क्रीडा, मनोरंजन, शोकपरिहार, कौतुहल असे अर्थ सांगतात.[५] रघुनाथ भास्कर गोडबोले यांच्या मते कौतुक, चमत्कार असा त्याचा अर्थ आहे.[६] वा. शि. आपटे यांनी To divert, amuse असे अर्थ देऊन 'शाकुंतला'तील पुढील उदाहरण दिले आहे : 'वच नु खलु आत्मानं विनोदयामि। लतासु दृष्टिं विनोदयामि।'[७] मोल्सवर्थ आपल्या कोशात 'विनोदा'च्या अर्थाची पुढीलप्रमाणे नोंद करतो.[८] 1. Start, play, diversion, pastime, sporting or playing. 2. Justing, joking इत्यादी. या सर्व कोशगत अर्थांमध्ये आज प्रचलित असलेल्या 'हास्य' या अर्थाची छटा असलेला कोणताही शब्द दिसत नाही, हे लक्षणीय आहे.

### 'टवाळा आवडे विनोद'

या संदर्भात समर्थ रामदासांची 'टवाळा आवडे विनोद' ही उक्ती समोर येते आणि रामदासांना विनोदाचे वावडे होते असा तिचा अर्थ केला जातो. वास्तविक रामदासांच्या प्रस्तुत चरणातच विनोदाचे स्वरूप दडलेले आहे. टवाळाला आवडणारा विनोद म्हणजे टवाळकी, टर किंवा टिंगल या विनोदाचे म्हणजेच रंजनाचे स्वरूप ग्राम्य, बाष्कळ किंवा थिल्लर असणार. उच्च दर्जाचा विनोद म्हणजे रंजन प्रकार येथे नसल्याचे रामदासांना सूचित करावयाचे आहे. भारतीय साहित्यशास्त्रातील नवरसात 'हास्य' हा महत्त्वाचा रस आहे. (हिन्दी साहित्यात 'हास्यकार' असा शब्द उपयोजिला जातो. हास्य या अर्थी 'व्यंग्य' आणि विनोदी कवीस 'व्यंग्य कवी' असे शब्द तेथे रूढ आहेत. मराठी सदृश अर्थाचा 'विनोद' किंवा 'विनोदी' असा शब्द प्रचलित नाही.) 'हास्य' रसाचा स्थायीभाव 'हास' आहे. विनोद नाही. टवाळाला आवडणारा विनोद ही एक विशिष्ट सांस्कृतिक पातळी रामदासांनी दाखविली आहे. भारतीय नाट्यशास्त्र प्रस्थापित करणाऱ्या भरतमुनींनी स्मित, हसित, विहसित, उपहसित, अपहसित आणि अतिहसित असे हास्याचे सहा प्रकार सांगितले आहेत. यातील स्मित आणि हसित हे उत्तम प्रतीचे, विहसित आणि उपहसित हे मध्यम प्रतीचे आणि अपहसित व अतिहसित हे नीच प्रतीचे हास्य प्रकार मानले आहेत. रामदासांचा रोख

Marathi No. 38 असा नोंदला आहे. मूळ मराठी मजकुरावर 'विनोदाच्या काहण्या' असे शीर्षक असले तरी आवरणपृष्ठावर इंग्लिशमध्ये 'Maharata History in Pleasing Tales' असे शीर्षक देण्यात आले आहे. या मोडी हस्तलिखिताची झेरॉक्स प्रत मी मद्रास युनिव्हर्सिटीच्या ग्रंथालयात करवून घेतली आणि नंतर देवनागरीत तिचे लिप्यंतर केले.[२]

कर्नल मेकेन्झी हा सन १७८२ मध्ये भारतात आला आणि १८२१ मध्ये त्याचे देहावसान झाले. या चाळीस वर्षांच्या कालखंडात त्याने हा संग्रह जमविला. यातील कित्येक हस्तलिखिते मूळ रूपात आहेत, तर काहींच्या नकला मराठी पंडितांकडून करवून घेतलेल्या दिसतात. या संग्रहातील 'विनोदाच्या काहण्या' या हस्तलिखिताच्या कर्त्याची त्यात नोंद नाही. त्यातील कथांचे किंवा कहाण्यांचे स्वरूप लोककथात्मक किंवा पारंपरिक आहे. कर्नल मेकेन्झी याच्या काळात रंजनासाठी या कथा लिहवून घेतल्या असल्या पाहिजेत. रंजन आणि उद्‌बोधन ही या कहाण्यांची वैशिष्ट्ये आहेत. त्यांच्या लेखनात पारंपरिक कहाण्यांचा लडिवाळ ढंग नाही. छोटी छोटी लयबद्ध वाक्यरचना नाही. त्यांच्या भाषेचे स्वरूप अठराव्या शतकाच्या अखेरील तंजावरी मराठीचे आहे. मराठी गद्याचा इंग्रजी अवतार होण्यापूर्वी त्यांचे लेखन झाले. त्यामुळे इंग्रजी भाषेचा (वा साहित्याचा) स्पर्श न झालेली पण खास तंजावरी ढंगाची भाषा या कहाण्यांतून वाचावयास मिळते. भाषाभ्यासकांना आवडेल असा हा दस्तऐवज आहे. इंग्रजीचा प्रभाव नसला तरी संस्कृत आणि अरबी-फारशी शब्दांची योजना त्यात जरूर आहे. इंग्रजपूर्वकालीन राज्यव्यवहाराशी परिचित अशा व्यक्तींनी त्याचे लेखन केल्यामुळे कदाचित तो प्रभाव राहिला असावा.

### 'विनोदा'च्या काहण्या

प्रस्तुत हस्तलिखिताचे शीर्षक 'विनोदाच्या काहण्या' असे असल्यामुळे मी त्याच्याकडे आकर्षिला गेलो. तथापि त्याचे मुळातून वाचन करताना त्या कहाण्या बोधप्रद आणि रंजक स्वरूपाच्या कथा असल्याचे आढळून आले. त्याचे इंग्रजी रूपांतरही Pleasing Tales असे करण्यात आलेले आहे. विद्यमान मराठी साहित्यात लोकप्रिय असलेल्या 'विनोदी' (Humorous) कथांसारखे त्यांचे स्वरूप नाही. स्वाभाविकपणेच अठराव्या शतकात 'विनोद' हा शब्द 'रंजन' या अर्थाने आणि 'विनोदी' हा शब्द 'रंजक' या अर्थाने वापरला जात असल्याचे स्पष्ट झाले. त्यामुळे 'विनोद' या शब्दाचा 'रंजन' हा मूळ अर्थ बदलत जाऊन 'हास्य' किंवा 'हास्यकारक' या अर्थाने त्याचे स्थित्यंतर किंवा अर्थांतर कसे झाले असावे, याची जिज्ञासा निर्माण झाली.

### विनोदः रंजनाकडून हास्याकडे

मनोविनोदन म्हणजेच मनोरंजन ही मानवाची स्वाभाविक प्रवृत्ती आहे. अनेक

कलाप्रकारांचा जन्म रंजनहेतुप्रधान असल्याचे दिसून येते. आनंदनिर्मिती हे त्यांचे अंतिम प्रयोजन असते. बुद्धिमंतांचा काळ काव्यशास्त्रविनोदात व्यतीत होतो.[३] बौद्धिक व्यवहारानंतर काही काळाचे रंजनही आवश्यक असते. म्हणजेच विशिष्ट कष्टकारक, उद्वेगजनक किंवा मनोमालिन्य आणणाऱ्या विषयांपासून चित्त अन्यत्र वळविण्यासाठी विनोदाची म्हणजे रंजनाची गरज असते. मूर्खांचा काळ मात्र व्यसन, निद्रा किंवा कलह यात व्यतीत होतो, असे सुभाषितकाराचे मत आहे.

विनोद या शब्दाचे वेगवेगळे अर्थ कोशकारांनी दिलेआहेत. कृ. पां. कुलकर्णी त्याचा अर्थ 'आनंद, थट्टा, गंमत' असा देतात.[४] तर जनार्दन विनायक ओक त्याचे घालविणे, श्रमपरिहार, क्रीडा, मनोरंजन, शोकपरिहार, कौतुहल असे अर्थ सांगतात.[५] रघुनाथ भास्कर गोडबोले यांच्या मते कौतुक, चमत्कार असा त्याचा अर्थ आहे.[६] वा. शि. आपटे यांनी To divert, amuse असे अर्थ देऊन 'शाकुंतला'तील पुढील उदाहरण दिले आहे : 'वच नु खलु आत्मानं विनोदयामि। लतासु दृष्टिं विनोदयामि।'[७] मोल्सवर्थ आपल्या कोशात 'विनोदा'च्या अर्थाची पुढीलप्रमाणे नोंद करतो.[८] 1. Start, play, diversion, pastime, sporting or playing. 2. Justing, joking इत्यादी. या सर्व कोशगत अर्थांमध्ये आज प्रचलित असलेल्या 'हास्य' या अर्थाची छटा असलेला कोणताही शब्द दिसत नाही, हे लक्षणीय आहे.

**'टवाळा आवडे विनोद'**

या संदर्भात समर्थ रामदासांची 'टवाळा आवडे विनोद' ही उक्ती समोर येते आणि रामदासांना विनोदाचे वावडे होते असा तिचा अर्थ केला जातो. वास्तविक रामदासांच्या प्रस्तुत चरणातच विनोदाचे स्वरूप दडलेले आहे. टवाळाला आवडणारा विनोद म्हणजे टवाळकी, टर किंवा टिंगल या विनोदाचे म्हणजेच रंजनाचे स्वरूप ग्राम्य, बाष्कळ किंवा थिल्लर असणार. उच्च दर्जाचा विनोद म्हणजे रंजन प्रकार येथे नसल्याचे रामदासांना सूचित करावयाचे आहे. भारतीय साहित्यशास्त्रातील नवरसात 'हास्य' हा महत्त्वाचा रस आहे. (हिन्दी साहित्यात 'हास्यकार' असा शब्द उपयोजिला जातो. हास्य या अर्थी 'व्यंग्य' आणि विनोदी कवीस 'व्यंग्य कवी' असे शब्द तेथे रूढ आहेत. मराठी सदृश अर्थाचा 'विनोद' किंवा 'विनोदी' असा शब्द प्रचलित नाही.) 'हास्य' रसाचा स्थायीभाव 'हास' आहे. विनोद नाही. टवाळाला आवडणारा विनोद ही एक विशिष्ट सांस्कृतिक पातळी रामदासांनी दाखविली आहे. भारतीय नाट्यशास्त्र प्रस्थापित करणाऱ्या भरतमुनींनी स्मित, हसित, विहसित, उपहसित, अपहसित आणि अतिहसित असे हास्याचे सहा प्रकार सांगितले आहेत. यातील स्मित आणि हसित हे उत्तम प्रतीचे, विहसित आणि उपहसित हे मध्यम प्रतीचे आणि अपहसित व अतिहसित हे नीच प्रतीचे हास्य प्रकार मानले आहेत. रामदासांचा रोख

टवाळांना आवडणाऱ्या अपहसित आणि अतिहसित या हास्यप्रकारांकडे आहे. आचार्य प्र. के. अत्रे यांनीही विनोद स्वतः वाईट नाही, पण त्याचे नातेवाईक वात्रटपणा, गावंढळपणा, चावटपणा, ग्राम्यता, अश्लीलता आणि बीभत्सपणा यासारखे फार असल्याचे म्हटले आहे.[९] रामदासांनीच हास्यस्वरूपाच्या करमणुकीत रमणारा तो 'रजोगुणी' असल्याचे स्पष्टपणे सांगितले आहे. (टवाळी ढवाळी निंदा। सांगणे घडे विवादा। हास्यविनोद करी सर्वदा। ती रजोगुण ॥) 'धन्य तें गायनी कळा' म्हणणारे रसिक रामदास उच्च प्रतीच्या हास्याची अपेक्षा करीत असतील, तर ते योग्यच होय. टवाळा आवडे विनोद या उक्तीतील गर्भितार्थ लक्षात न घेता, रामदास हास्याचे वावडे असणारे अरसिक होते, असे सुचविणे म्हणजे त्यांच्यावर अन्याय करणे होय.

### मानसिक ताण दूर करणारा विनोद

विनोद या शब्दाचा दुसरा एक अर्थ वि + नुद् म्हणजे दूर करणे To set aside हाही महत्त्वाचा आहे. ज. वि. ओक यांनी 'घालविणे, श्रमपरिहार, शोकपरिहार' असे आणि वा. शि. आपटे यांनी 'To divert, removing, driving away, श्रमविनोद, A diverstion' असे अर्थ आपापल्या कोशातून दिले आहेत.[१०] रा. श्री. जोग यांनी मनाला आलेला शीण दूर सारण्यास ज्याचा उपयोग होतो तो विनोद हा त्याचा स्वाभाविक अर्थ असल्याचे सांगितले आहे.[११] मनाला आलेला कंटाळा, उद्वेग, शीण दूर सारणारा रंजन प्रकार तो विनोद असे यावरून म्हणता येईल. बौद्धिक वा अन्य कार्याने आलेला शिणवटा, काही कारणांनी आलेला मानसिक तणाव दूर करून, विनोद हा रंजनप्रकार मनुष्याला ताणविरहित आणि ताजातवाना बनवितो. कारुण्य आणि हास्य यांचा अन्योन्यसंबंध याच दृष्टीने पाहावा लागेल. मनाला स्थिर व शांत बनवून समधातता प्राप्त करून देण्यास विनोद हा रंजनप्रकार साहाय्यकारी होतो.

### केळकरांची 'हास्यविनोद मीमांसा'

उच्च प्रतीचा वाङ्मयीन हास्यविनोद या अर्थाने जुन्या मराठी साहित्यात निश्चित शब्द आढळत नाही. महानुभाव साहित्यात रळी-राजमळी असे शब्द योजले असले तरी ते थट्टा-मस्करी या अर्थाचे समानार्थक जोडशब्द आहेत. मोल्सवर्थने आपल्या कोशात विनोद या अर्थाने दिलेले joking, jesting, bantering किंवा ralluing हे सर्व शब्द, थट्टा, मस्करी, गंमत याच अर्थाचे आहेत. त्यात साहित्यिक विनोदाचा अंतर्भाव नाही. प्रस्तुत मोडी हस्तलिखितात विनोद हा शब्द रंजन या अर्थी वापरण्यात आलेला आहे. ('आळशी पुरुष विनोद यैशा कामाते अनुसरतो'— कहाणी ८ वी)

मराठीमध्ये हास्यविनोदाची पहिली मीमांसा नं. चि. केळकर यांनी केली. श्री. कृ. कोल्हटकरांचा 'साक्षीदार' या 'विविधज्ञानविस्तारा'त प्रसिद्ध झालेला लेख म्हणजे

आधुनिक मराठी विनोदी साहित्याचा प्रारंभबिंदू होय. 'हास्य' या अर्थी 'विनोद' शब्दाच्या योजनेची मीमांसा करताना श्री. केळकर म्हणतात, 'हास्यविनोदाचा विचार आधुनिक काळात सुरू झाला, तो इंग्रजी वाङ्मयाच्या परिचयाने. अर्थातच त्यातील मुख्य व रूढ पारिभाषिक शब्द 'विट' व 'ह्यूमर' हे शब्द तोंडात बसले आणि जणुकाही हे दोन शब्द त्या विषयाचे मुख्य शास्त्रीय विभाग दर्शवितात, अशा समजुतीने त्यांना समानार्थक प्रतिशब्द योजण्याचा प्रयत्न सुरू झाला. पैकी 'विट' याला 'कोटी' व 'ह्यूमर' याला 'विनोद' हे मराठी शब्द रूढ होऊन बसले.[१२] पुढे 'हास्यरस विचार' या प्रकरणात केळकरांनी म्हटले आहे, 'रसा'चे 'हास्य' हे नाव किंवा त्याच्या स्थायिभावास 'हास' हा योजलेला शब्द कोणास रुचत नसल्यास तेथे अनुक्रमे विनोद व विनोदन हे पर्याय वापरावेत.[१३] यावरून १९३८ पर्यंत विनोद व हास्य हे दोन शब्द समानार्थक म्हणून प्रचलित होते असे म्हणता येते. समानार्थक जोडशब्दातील जुना शब्द हळूहळू गळून पडतो, आणि नवा शब्द भाषेमध्ये रूढ होतो. या सर्व स्थित्यंतरात विनोदाचा 'रंजन' हा मुख्यार्थ लुप्त झाला. ललितकलांच्या प्रयोजनाचे व्यापक रूप दर्शविणारा 'विनोद' हा शब्द साहित्यप्रकारातील एका भागापुरता अगदी वेगळा आणि मर्यादित अर्थ घेऊन रूढ झाला.

**'विनोदाच्या काहण्या' : स्वरूप**

प्रस्तुत मोडी हस्तलिखितातील कहाण्यांचे स्वरूप रंजक तसेच उद्‌बोधक आहे. त्यात चातुर्यकथा आहेत, नीतिकथा आहेत. कहाण्यांच्या Pleasing Tales या इंग्रजी शीर्षकामुळे त्यांचे रंजक स्वरूप स्पष्ट होण्यासारखे आहे. या कथा लोकजीवनात प्रचलित असाव्यात आणि त्यांना कर्नल मेकेन्सी यांच्या प्रेरणेने लिखित रूप प्राप्त झाले असावे. धार्मिक स्वरूपाच्या व्रत-वैकल्याच्या कहाण्याही या काळात लिहिल्या जात असाव्यात. प्रस्तुत कहाण्या म्हणजे अठराव्या शतकाअखेरीच्या मराठी लघुकथा म्हणावयास हरकत नसावी.

इ.स. च्या पहिल्या शतकात होऊन गेलेल्या विष्णुशर्मा नावाच्या पंडिताने संस्कृतमध्ये नीतिविचार सांगणाऱ्या प्राणिकथा 'पंचतंत्र' या ग्रंथात लिहिल्या आहेत. अमरशक्ती नावाच्या राजाच्या पुत्रांना ज्ञानी बनविण्याच्या हेतूने त्यांचे लेखन झालेले असल्यामुळे बोधप्रदता आणि रंजकता किंवा ज्ञान आणि मनोरंजन या दोहोंचा संयोग त्यात झाला आहे. रामायण, महाभारत, स्मृतिग्रंथातील श्लोकांचा आधारही त्याने वेळोवेळी घेतला आहे. व्यवहारचातुर्य, राजनीती इत्यादी अनेक विषय त्याने रंजककथाद्वारा परिणामकारकपणे निरूपिले आहेत. त्याला जागतिक प्राणिकथांचा प्रणेता असेही मानण्यात येते. 'विनोदाच्या काहण्या'मध्ये प्राणिकथांचे प्रमाण कमी आहे. 'पंचतंत्रा'च्या धर्तीवर आणि आधारावर चौदाव्या शतकात नारायण पंडित नावाच्या गृहस्थाने 'हितोपदेश' या ग्रंथाची रचना केली. नीती, सदाचारांचा बोध करणाऱ्या कथांचा समावेश त्यात आहे. 'विनोदाच्या कहाण्या' अठराव्या शतकातील आहेत. त्यांचे

स्वतंत्रपण व्यावहारिक पातळीवरील कथांमुळे विशेषत्वाने जाणवते. अन्य ग्रंथांप्रमाणे संस्कृत ग्रंथातील श्लोकांचा किंवा अवतरणांचा वापर त्यात आढळत नाही. कदाचित एखादा ग्रंथ लिहिण्याच्या हेतूची प्रेरणा त्यामागे नसावी. आपल्या धन्याच्या आज्ञेनुसार लोकजीवनातील प्रचलित कथा शब्दबद्ध करण्यात आल्या असाव्यात.

धार्मिक स्वरूपाच्या, व्रतवैकल्याच्या कहाणीतील वाक्यरचना सुटसुटीत, भावमधुर, लडिवाळ, श्रद्धापूर्ण अशी असते. 'विनोदाच्या काहण्या' या कथात्मक स्वरूपाच्या, काही वेळा पल्लेदार, भारदस्त वाक्ययोजना असणाऱ्या आहेत. सत्कार्याचे मोल घेऊ नये, दुसऱ्याने केलेले उपकार जाणून प्रत्युपकार करावेत, विद्या हीच सर्व संकटातून मनुष्याला तारून नेते, विद्या हेच मोठे धन होय, कष्टांमुळेच भाग्योदय होतो, आळशीपणामुळे असत्य वर्तन घडते आणि वेळ वाया जातो, सत्पात्री दान करणे महत्त्वाचे, कारण त्यामुळे देवही ऋणी बनतो, अति हाव बाळगली असता तीमुळे इतरांचे तसेच स्वतःचेही नुकसान होते, कल्पनेच्या राज्यात वावरल्यामुळे व्यवहारात नुकसान होते, वृथा स्तुतीमुळे भुलून जाऊ नये, मनात विकृत भाव निर्माण झाले तरी दुसऱ्या चांगल्या गोष्टी पाहिल्या असता विकृत भाव राहत नाहीत, यासारख्या सूत्राचे संसूचन या काहण्याद्वारे होते.

इंग्रजीचा स्पर्श नसला तरी अरबी-फार्शी भाषेतील पुढील शब्दांची योजना या कथांतून झाली आहे. रुजू, तबदील, वाकफगार, दगाबाज, खिजमतगार, मगदूर, मेहनत, तमाम, नजर, जहाज, शिपाई, यार, मजूर, रोजबरोज, मारिफात, सलतनत, सरकार, तमाशा इ. शिवाय भोय, रांधरुणी, वोपणे, अधृष्ट, मात्केन, वऱ्हाड करणे, आसके यांसारख्या जुन्या मराठी शब्दयोजनेमुळे कथेला मराठमोळे रूप प्राप्त होते. दशेते, अधृष्टाते अशी द्वितीयान्त, दाहण्याकडून (मुळे) अशी तृतीयान्त, लेकामाजी अशी सप्तम्यन्त रूपे आढळतात. 'पंडित पुत्र. . . बलाऊन घेतला' अशी प्रथमान्त कर्तरी रचनाही आढळते. अशी भाषेची अनेकविध रूपे या काहण्यांतून दिसून येतात.

या काहण्या मूळ मोडी लिपीत आहेत. मोडीचे लपेटदार वळण लक्षात घेता काही ठिकाणी शब्द वा अक्षर नीट लागले नसण्याची शक्यता आहे. तथापि त्यांची यथाशक्य मूलानुसारी संहिता पुढे देण्याचा प्रयत्न केला आहे. काहण्यांना अनुक्रमांक नव्याने दिले आहेत. परंतु शीर्पके आणि मांडणी यथामूल ठेविली आहे. शेवटी विशिष्ट शब्दयोजनेचे अर्थ दिले आहेत.

## विनोदाच्या काहण्या

### १. औदार्य आणि कृतज्ञतेविषई

मेलन नामक शहरात येक मजूर राहत होता. तो दोनशे रुपयेकडून भरली होती तैशा येक्या पिशवीस पाहून त्याते प्रसिद्ध केला. ज्याची पिशवी हरवली होती तो मनुष्य ते



अनुक्रमणिका

वर्तमान ऐकून त्या कुणबीच्या घरात जाऊन तिथे ती आपुली म्हणून चांगले रुजू करताच त्याने ती थैली त्यास दिल्ही. ती घेतल्यानंतर आपुला संतोष आणि कृतज्ञतेमुळे वीस रुपये त्या मजुरास द्यावे म्हणून इच्छिला. पण तो त्याते घेतला नाही. नंतर दहा तरी पाच तरी घ्यावे म्हणून सांगितल्याही तो तेही घेतले नाही. शेवटी तो ती पिशवी भोईवर टाकून म्हणाला जे तुम्ही मजला येवढे प्रत्युपकार करून देईना. सगळ्या म्या गमावलेच नाही. त्यानंतरे तो मजूर पाच रुपये घ्यावयास संमत होऊन, सवेच ते घेतल्यानंतर तो गरीबास आणि आपुल्या विद्यमान दशेते आणि अधृष्टाते अतिक्रमून, व्यर्थ दुराशा करून, मदोन्मत्त जाला (त्या)वर त्याजमुळे अत्यंत दुःखी होणे मात्र नव्हता काही होणे नाही म्हणून समजावे, याप्रमाणे आहे करिता दुसऱ्याने केलेल्या उपकारास जाणणेही आणि आपण उपकृत जाहल्याने तर शक्त्यनुसार त्यास उपकार करणे हा उदार ऐशे लोकाम खुणा होत.

**२. कृतज्ञता नसावी म्हणून सांगणे विषई काहणी.**

येक कुटुंववत्सल ग्रहस्त बहुत प्रयत्नाने थोडे धन संपादून कालक्षेप करीत असून, माहतारपणी त्याने आपल्या लेकरास आपली चीजवस्ती दिल्ही. त्याकरिता त्याचे मुलाने काही यक तजवीज न करता ते धन अवघे खर्च करून, येकची खणाची हवेली बागबगीचे वगैरे खरेदी करून, उदंड चाकर व कलावंतीण वगैरे लोकास चाकर ठेऊन, नाना प्रकारचे विलास करीत आपुल्या थोर्वीत तबदील होता. त्याचा बाप येक्या झोपडीतच वास करीत, फुटक्या भांड्यात स्वयंपाक करून खात, ते खरकटी आपल्या हाताने घाशीत होता. त्याचा नात फार शहाणा, तो आपल्या आजाची अवस्था पाहून, फार कष्टी होऊन त्याशी बोलला की तुम्ही रांधरुणी फुटक्या भांड्यात, आपल्या हाताने रांधत आणि त्या खरखटीते घाशीता, इतुके कष्टी व्यवसाय ! याकरिता याचे तात्पर्य काय म्हणालिया जो कोणी माझी गोष्ट ऐकून हे भांडे अवघीही फोडून टाकिलानंतर तुमचे व्यसन अवघेही दूर होऊन जाईल म्हणून सांगितला. तो मातारा (म्हणाला), तैसे होईल की ते भांडे कुंडे फोडून टाकिले असता तुझ्या बापास फार राग येईल, तेव्हा माझी अवस्था पूर्वी परीस नासेल म्हणून सांगितला. ते ऐकून त्याचे नाताने माझी गोष्ट ऐक. तुझे काही नासना म्हणून सांगितला.

त्याकरिता येक्या दिवशी दुपारा भोजनानंतर तो मातारा आपुला ल्योक व नातू असना खरकटी धुवून घेतो म्हणावयाचे मीसे करून त्या भांड्याते फोडिला. तेव्हा त्याचे नाताने एक काठी घेऊन त्या माताऱ्याला मारावयास त्याचे अंगावर गेला. त्याचा बाप 'का रे येडा जालास काय' म्हणून बोलिला तो 'मी जे करितो ते नीटच आहे. ते कैसे म्हणालियाने या पात्राते फोडून टाकिला. तुम्ही मातारा व्हाल तेव्हा मीही फुटकी भांडी कोठून मिळवीन त्यास्तव तुझे बापास मारावया जातो, म्हणून सांगितला.' तेव्हा त्याचा बाप त्याचे तात्पर्य उमजून घेऊन माताऱ्यास आपुल्या घरास बालावून आणून त्याची चाकरी करावयास्तव चाकर लोकास ठेविता जाला.

लेकरास विद्या शिकविणे मायबापाचे नीती होय. चांगले झाडास पाणी बांधिले तर पुष्पफलदीके कडून तो झाड नीट फुलतो. तसे एक मूळ करायाचे काम त्या मुलास नीट शिकविल्याने तो मूल श्रयस्कर होऊन्न राहील. न शिकविले असता समस्त कामही नासून जातील.

**३. कृतघ्नतेविषयी**

जो आपुल्यास उपकार केलेल्या माणसावर विरोधेकडून वाईट चिंतितो की तो केव्हाही बरा असना.

एक भाग्यवंत जण अरुणोदयी घोड्यावर बसून एक्या शहरावरून जात असता अनेक मोहरे गुंडीलले होती, ऐशी एक कागदाची पुडी त्याला न कळता त्याचे खिसेतून वाटेत पडली. येक्या गरीब बिचाऱ्याने ती पुडी घेऊन्न न्यायाधिशापाशी आणिली. त्या न्यायाधिशाने ते त्या शहरात प्रसिद्ध केले. त्यानंतर तो भाग्यवंत कचेरीस आला आणि न्यायाधिशही त्यास ते मोहरेही देउ(न) टाकिला.

त्या साहुकाराने सांगितले, ने ते मजपाशी आणीक दुसरे होते. ज्यास हे मोहरे सापडले आहेत, निःसंशयेकडून त्याचे धृष्टीस तेही पडले असावे.' त्यावर तो गरीब भिऊन्न न्यायाधिपतीशी खरे सांगितला, जे 'जितुके मला सापडले होते, तितुकेही आपणास ओपिले आहे. पण मजपाशी काही नाही.'

शेवटी त्या न्यायाधिपतीने ज्यात ते मोहरे गुंडालले होते, ते कागदाची पुडी आणऊन, पुन्हा ते मोहरे त्यात गुंडाळून पाहून, सोळा मोहरे परीस अधिक त्यात मावनात, म्हणून समजून त्या साहुकाराशी सांगितला जे 'हे सोळा मोहरे तुझे नव्हेत. का म्हणीजे ही पुडी अधिक मावना, करिता आणीक कोणाच्या धृष्टीस पडिले असतील की त्यास विचारून घेणे बरे.' मग 'हे मोहरे तुझे आहेत ते घेऊन्न तू घरास जा' म्हणून त्या गरिबास पाहून सांगितला.

**४. या विषईच दुसरी कहाणी**

येक थोर अग्निज्वालेत एक झुडप मागून जळत असता, त्या झुडपात येक साप होता, तो आपुल्या प्राणास भिऊन्न, ते चुकून घ्यावयास यत्न करीत होता. पण ते झुडुप त्या जाळेकडून जळेणेस लागले होते, की जेणे त्या सापास अवकाशच न मिळाला. त्या क्षणीच प्रयाण होऊन्न समोर येणार येक्या सावुकारास पाहून बलाऊन्न साप बोलिला जे 'अरे सख्या रक्ष माझ्या प्राणास.' सावकार बोलिला, 'तू विष जंतू आहेस. तुजशी काही एक संबंध करावयास मी भितो. जर मी तुला सहाय करीन, तेव्हा तू मला बघशील.' सर्पाने सांगितले की 'तुम्ही माझा प्राण संरक्षण कराल. तेव्हा मी तुमच्या प्राणास बाधा करीन म्हणून तुम्ही भिणेस गरज नाही.'

तो साऊकार उपकार करणारास अपाय घडेना का म्हणोन तैशास ईश्वरच यथार्थ संरक्षण करील' म्हणून म्हणता तर यैसे योजून एक्या पिशवीच्या दोनी बाजूस दोरी बांधून,

त्यास एक्या काठीच्या शेवटास आवळून, त्या झुडुपात ती घातली. तो सर्प त्या पिशवीत घुसताच त्यास उचलून सोडून दिल्हा. तो सर्प क्रूर आणि युक्तिवंत. भल्याकरिता आपल्याला अत्यंत नम्रतेने असून, चिमटून घेऊन आपुल्यास उपकारी ऐशा साऊकारास दुखावया गेला. तेव्हा तो साऊकार बोलिला, 'का तू ऐसे अयोग्य काम करतोस' साप बोलिला, 'तु मला उपकार केला असला तरीही मी तुला मारण्याविषई तो उपकार करू सकना, का म्हणीजे आमच्या उपकारी लोकांस अपकार करणे (हा) आमचा संप्रदाय. आम्ही स्वभावेकडून मनुष्यास कात करणार आणि मनुष्यही आम्हास आणि इतर जंतूस शत्रू म्हणवितो. याविषयी संदेह असेल तर तुझ्या संतोषास्तव कोणास तरी विचार.'

तेव्हा त्याचे समोर चरत असावयाचे शेळीस पाहून ते दोघेही त्यापाशी जाऊन ते वर्तमान सांगू लागले. तेव्हा त्या सर्पाने पाहिले विचारले जे, 'हा मनुष्य यद्यपि मला उपकार केला आहे, तथापि मी त्यास मारू की नको' शेळीने सांगितले की 'आताच तसे कर थोडके तरी आलस्य करू नको. या मनुष्याच्या स्वंभावास मी नीट वाकफगार आहे. त्याविषयी मी थोडेसे तुला सांगतो. माझ्या केसाने विणलेले झबले नेसत, त्यावर बसत असले तरीही त्या उपकारास आठवण न करिता, मिळाल्यानंतर माझ्या दुधेकडून वहाडत असावयाच्या माझ्या पिल्लास मारण्याकडून माझे मन कापविता (त). तेणेकडून मलाही एक दिवस मारतील. म्हणून माझ्या मनास उदंड व्यसनही व भयही होते. करिता ऐशा मनुष्याला नाश कर.' मात्र चुकी नव्हे, म्हणून सांगितले. तेव्हा तो साहुकार म्हणाला, जे असे सांगितले तरीही एक साक्षी पुरना. आणिक दोघे तिघे मंजुर करितील, तर माझे अघृष्ट म्हणुन ओपून घेतो.'

त्यानंतर ते दोघेही यक महातारी गाईस पाहून हे वर्तमान तीशी सांगता ती गाय 'मी मनुष्याची वर्तणूक सांगू काय पहा. येकजणापाशी मी राहून वरषास वासरू वीत होते. कोठेतरी बाहेर गावात जाऊन येऊन दूध देत होते. त्या दुधामुळे रबडीही, दूधही, लोणीही आणिक अनेकविध साजुक पदार्थेही होत होते. याप्रमाणे बहुत वर्षांपासून त्यास उपकार होत असल्याही मी मातारी जालेसे पाहून मला कसायीपाशी विकिला. तो मला उद्या मारील. असे मनुष्य फार दुर्भागी चालणार. करिता या क्षणीच त्याला मारावे' म्हणून सांगितले.

त्या गोष्टी ऐकून तो सावकार आपण मरतो म्हणून समजून भिऊन रडत होता. त्यानंतर तेथे होता तो एक कोल्हा त्यासी सांगितला जे, 'अरे मित्रा, कशास्तव भिऊन चिंतायुक्त आहेस.' तो सावकार काहीच बोलिला नाही. तेव्हा सापाने 'याची काहणी ऐक' म्हणून सांगितले. त्याने मला घोर अग्नीत न पडता वाचविला, ते खरेच. पण आता मी यास डसावयास जातो. का म्हणिजे उपकार केला त्यास अपकार करणे (हा) आमचा स्वभाव. त्याशिवाय शेळीही गायही यास मारावे म्हणून सांगितले आहे.'

तेव्हा तो कोल्हा बोलिला जे, 'हे यैकणेस मला फार आश्चर्य वाटतो. आगीतून याने तुला कसा वाचविला की ते ध्यान करून सांग.' तो सर्प सांगू लागला, की तो साऊकार

एक्या काठीला एक पिशिवीस बांधून त्या झुडुपात टाकिंला. मी त्यात घुसल्यानंतर मला काहून सोडून दिल्हा. तीच पिशवी त्याचे खांदेवर आहे पहा.' ते ऐकून कोल्ह्याने सांगितले, की 'तुझे शरीर फार थोर. ती पिशवी फार लहान. त्यात तू कसा शिरलास, ते कसे मावले, मी पाहिल्याखेरीज मानणार नाही.'

तेव्हा तो सर्प त्या सावकाराजवळून ते पिशवी मागून घेऊन माटकेन त्यात शिरताच कोल्ह्याने त्यास इशारा केला, की, 'ती पिशवी घट्ट आवळून, काठी घेऊन मारून टाक' म्हणून सांगताच त्या सावकाराने तसेच केला. करिता कोल्ह्याने सांगितला त्या उपायेकरून तो सावकार त्या सर्पास मारून आपुले प्राण वाचवीला. या प्रकारे आहे. करिता उपकार करणारास, अपकार चिंतणारही त्यास हिंसा करणारही कधीही बरे असना.

५. शीक्षेचं फल

गुणेने ते भाग्यास कारण होय. शास्त्राचे ठायी सर्वदा आसक्त होऊन रहाणेने तो व्यासंग म्हणवितो, तोच गुणास कारण. भाग्यास फलविषय भोग. गुणास फळ भूषण होय. या विषई कहाणी लिहिजे ते...

येक राजाचे सन्निधानी या गोष्टी सर्वदा सांगत होता. तो राजा या गोष्टीचे यथार्थ समजावे म्हणून आपुल्या लेकरापैकी येक जणास येका पंडितापाशी अर्पून विद्या आणि नीतिशास्त्र सांगावे म्हणून त्याला नित्य नवे पाठ वाचावे म्हणून ही आज्ञापिला. दुसऱ्या एकास दररोज येक नवे अमोल्य रत्न देत होता. तो पहिला क्रमेकडून विनय, नम्रता, विद्या, सद्‌गुणादिकाशीयुक्त होत्साता आपल्या विषई बहुत आस्थायुक्त होऊन रहात होता. पण तो दुसरा मुलगा आपल्या भाग्यातीशयेकडून दररोज बडायी आणि दुर्भार्गाशी युक्त होऊन असल्यामुळे पढण्यात त्याचे मन नवते. ते दोघे थोर होताच येका दूर देशास गेले. तो भाग्यवंत बहुत द्रव्य घेऊन गेला. पण तो विद्वास जो तो स्नेही सारीखी. कामा येणारी विद्याच. करिता प्रत्येक पुस्तके मात्र घेऊन गेला.

तो भाग्यवंत पुत्र जो तो कोणा येक्या शहरास येऊन उदंड दुर्मार्गे आणि दगाबाज लोकांशी मिळवून त्यांच्या दुर्बोधने करून आपुले अवघे द्रव्यही मद्यपान वगैरे दुर्व्यापारात खर्च करून आणि कर्जदार होऊन कैदेत जाऊन पावला.

तो विद्वांस येक्या राजसन्निधानी प्रवेश केला असता तो राजा त्याची मर्यादा, योग्यता आणि त्याची विद्वत्ता वळखून, त्यास आपल्यापाशीच राहून घेऊन, त्यानंतर त्याशी नीट परिचय करून त्याला घर बांधऊन दिल्हे. शेवटी त्याच्या योग्यतेकडून तो राजा प्रसन्न होऊन, आपुले लेकीस त्यास देऊन, वऱ्हाड करून आणि उदंड पैकेही देऊन आणि त्यास चाकर, नोकर, बटिक, खिसमतगार वगैरे लोकांशी आपल्या देशास पाठविता जाहला.

त्याचा बाप त्याच्या येणेच्या गलब्रतेस ऐकून बहुत भ्याला. तेव्हा यक हरकास येऊन 'अहो राजा, भिऊ नका. तुझा ल्योक यताहे' म्हणून सांगितला. ते ऐकिल्यानंतर तो राजा










आपुल्या दरबारी लोकांसही, सोयेंधार्येसुद्धी त्याचे भेटीस पाठऊन, त्यास वाड्यात आणवून, त्याशी भेटून, जवळ बसवून फार संतोष मानून, त्याचे सामर्थ्य नीट कळवून घेतल्यानंतर आपुले राज्य त्यास दिल्हा.

त्या राज्याचा भाग्यवंत पुत्र जो तो कर्जदार होऊन कैदेत पडला आहे, हे वर्तमान ऐकून त्या राज्याचा पंडित पुत्र त्याचे कर्ज वारून आपल्याजवळ बलावून घेतला. या प्रकारे त्या राजाने विद्येचा आणि भाग्याचा भेद जाणता झाला.

**६. काहणी**

विद्येचे गुणयंत्र ती विद्या सांगणारास आणि ग्रहण करणारासही वाहडवीत असते. तुम्ही कोणता पदार्थ तरी दुसऱ्यास दिल्हे असता त्यात तुमचे स्वत्व राहत नाही, पण या विद्येचे महात्म्य काय म्हणालिया विद्वांस म्हणविणार जो तो आपुल्या विद्येचे न गमाविता पुढती विद्येचे दान करीतही असुधे आणि दुसरा त्याचे ग्रहण करीतही असुधे रूपे, सोने, माणिक वगैरे सर्व दाहण्याकडून त्या पदार्थाचे राशीही उणी होऊन जाते. दुसऱ्यास सांगण्यामुळे विद्या दररोज अधिवृद्धी होणेचे शिवाय उणी होत नाही. कोणत्या विद्येकडूनही द्रव्य गेल्यासारिखे विद्या जात नाही. खर्च होत नाही. चोरजेली होत नाही. आणि हितोपदेष्टा अंतरीचा आपुल्या येणार यशापायास कळऊन त्यापासून होणार जे फल त्याते दाखविते आणि केव्हातरी ग्रहचारामुळे आपदा आले असता विद्या सल्हा देईल आणि प्रत्येकास विद्येसारिखे अंतरंग मित्र कोणी नाही. आणि अंधारातही दिवसाच्या उजेडासारिखे लोकामाजी विद्येचा प्रकाश जाणावा. आणि येक्या दिव्यात दुसरा दिवा लावणेकडून पहिला दिवा विजत नाही. त्याप्रमाणे विद्या सांगणेकडून खुद्द तल्लक्षण अंधळ्याचे मोर्ध्य (?) तल्लक्षण अंधकारास परिहार करीते. पण सांगणाराची विद्या उणी होत नाही.

करिता ज्या पाशी विद्या तल्लक्षण धन तो आपुल्या आलस्यामुळे ते गमाविता नये आणि आपुले भर मगदूर दुसऱ्यास सांगण्याविषयी कंटाळा होऊ नये म्हणून समजावे.

**७. काहणी– जाग्रतेविषई**

मेहनत केलीया भाग्य येईल. आपुल्या कार्याकरिता या काहणीत सांगितलेल्या दृष्टांतास मनी राखून त्याप्रमाणे वर्तणूक करा.

येकजण मरतेवेळेस आपुल्या लेकास बलावून आपुल्या द्राक्षाच्या मांडवाखाले पैका पुरून ठेविले आहे म्हणून सांगितला. तो मेल्यानंतर त्याचे क्रिया उरकून घेऊन अवघे येकवट मिळून, त्याच्या बापाने पुरून ठेवीले ते धन उकरून घेणेस्तव, त्या द्राक्षाचे मांडवाखाले उदंड ठाई खांडिले. पण अमके ठाई पैके पुरून ठेविले म्हणून त्या जागेची खूण या मुलास सांगितला नाही. त्याकरिता सदरहू मांडवाखाली तमाम कंबरभर खाल खाणिले. तेव्हाही तेथे काही नजर पडले नाही. करिता ते खास मात्केन पुरून द्राक्षाची वेली कातरून, त्यात लाऊन वहाडविले. त्यावर्षी दरसालापेक्षा वीस गुण राशी फळले करिता त्याचे खर्चवेच अवघे जाता

त्या लोकांस उदंड धन मिळाला. तेव्हा त्याच्या बापाने 'या बागात उदंड पैका पुरून ठेविले आहे, तुम्ही काहडून घ्या' म्हणून सांगितला की त्याचा अर्थ हाच ऐशे समजले करिता कष्ट केल्या भाग्य मिळेलसे समजावे.

८. काहणी– गरीबीविषयी अलस्य

अलस्याचा एक भाग अभाव असे.

व्यसन ते केवळ दुःखास्पद पण काही होणे नाही. आलस्य जे ते शरीरास थोर रोग होय. ते कैसे म्हणालिया त्याकडून उदंड दुःखास असंभावीतही व्यसनही उत्पन्न होते.

पहिले ज्याचे अंग वळत नाही की तो लटके वाकावयास मागे सरणार नाही. त्यास धृष्टांत काय म्हणालिया त्याशी कोणीतरी अमक्यापाशी जाऊन ये म्हणून सांगता तो तेव्हाच तो मनुष्य घरी नाही म्हणून सांगतो आणि कोणते वस्तुतरी आण म्हणून सांगितल्या. . . कळेलसे सांगतो.

दुसरे आलशी पुरुष विनोद ऐशा कामा ते अनुसरतो पण कोणतेही काम करू समजा आपुल्या कार्यानेच आपण वर्तन करिता त्याचे मालमत्ता सौख्य प्रतिदिन उणे होत आहे असे आणितो, सकल दोषासही पात्र होऊन असतो.

तिसरे अलशी लोक दुसऱ्याचे आश्रय करू सकनात. त्यास्तव त्यापाशी कोणते वस्तु असलियाही दुसऱ्याच्या आसऱ्याखेरीज आणि सल्ल्याखेरीज ते त्यास मिळू सकनात. यास्तव हर कोणी आपुल्या कामात जाग्रतेने असावे.

९. काहणी– उपकाराचा विधी

ज्या लोकास कोणाचाही आसरा नाही की तेच दामपात्रं होय– भाग्यवंत लोकास दान दिल्ह असता तैसे फल मिलणा ते कैसे म्हणालिया येकदा बी पेरलेल्या शेतात दुसऱ्यांध ब्या पेरले असता ते दोन पटलही पासून जाईल.

कैसे म्हणालिया गाईचे शेण ज्या केल्या ओंगळ घाण येत असते. त्या शेणाकडून भोय सारविल्याने ती जागा निर्मल असते. त्याप्रमाणे भाग्यवंताने संग्रह करायाचेवेळी त्याला लोभी म्हणत असून गोरगरीबास तो वळीहल्ली देऊ लागला असता तेव्हा त्याला महाउदार आणि दयाळू असे म्हणत असतात. ते शेतकरी कोयीत ब्या पेरितो ते शेत विस्तारेकडून पिकते, तसेच गोरगरीबावर दयेकडून दान देणे जे आहे ते आम्हास संतोषही त्या लोकांस तृप्तीही होत आहे. ते का म्हणालिया जो दरिद्र जनास अन्नपानादिक देऊन त्याचे मन संरक्षण करितो की तो देवास करज दिल्हा आहे. करिता देवही आम्हावर कृपाळू होऊन असतो. याप्रमाणे पात्रापात्र वळखून दान दिधले असता तो मनुष्य देवमानव व ग्राह्य होतो. म्हणून समस्त शास्त्रातही प्रतिपादन केले असे जाणावे.

१०. असोसपणाविषई

येखाद्याचे भाग्यास असूया करणारही, येखादा संतुष्ट होऊन असलिया सर्वदा व्यसन

मानणारही दुःखिला पाऊन संतोष मानणारही या प्रकारचा मनुष्य आपुल्या दूरधृष्टास आपणच बाध्य होऊन असतो. दावानलेकडून झाडेझुडपे जळल्यापरीस असोश्याचे मन सर्वदा जळत असते. असोश्याचे मनास संतोष आणि स्थैर्य कधीही असना. मनुष्यास आपला दुर्गुण स्वभाव होय. करिता दुर्गुण यैसा मोड निघताच जाणीव लक्षण कुऱ्हाडेकडून तोडून वहाडून देईना. सेंगलिया (?) या व्यसन परंपरेत आम्ही जाणून सकू. पण उदंड संतोष आपुल्या आपणच घडेल. यास धृष्टांत सांगतो तो यैक.

येकजण आपुल्या शेजाऱ्याच्या भाग्यास आणि संपदेस पाहून सोसू सकनाते अरण्यास निघून गेला. एक ऋषीने या असुयावंतास पाहून त्यावर दयेने यंत्रेकडून अभिमंत्रित येंक फासा त्यास दिल्हा. त्या फासेचा गुण काय म्हणालिंया तीनदा जे जे मनात आठवून फासा खेळता की ते होणे असे आहे. करिता तू तीनदा जे जे मनात योजून फासा घालशील की ते होयील. पण तुझ्या शेदारल्यास ते दुगुणी होईलसे त्या ऋषीइश्वराने त्याशी सांगितले. तो घरास जाऊन शेदारल्यास भाग्य येईल म्हणावयाची गोष्ट विसरून आपणास उदंड घरदारही शेतधोतही सोनेरूपे वस्त्राभरण मिळावे म्हणून फासा टाकिला. तसेच ते अवघेही मिळाले. पण शेदारल्यास ते अस्केही दुगुणीने मिळाले. तेव्हा ती गोष्ट त्याला सुचून शेदारल्यास खराब करावे म्हणून आपुल्यास येक डोळा जावे म्हणून दुसऱ्यांदा फासा टाकिला. तेव्हा शेदारील्याचे अवघे घर भूमित बुडून गेले. तेव्हा त्याचे चाकर अवघेही निर्मनुष्य एक्या त्या ठायी त्यास पाहून अवघेही येकमत होऊन त्यांनीच केले असे समजून त्यास नीट मारून त्यापाशी होते ते पैके अवघेही घेऊन जाहजावर बसून पळून गेले.

तेथे याचे आक्रोश यैकणारदेखील कोणी नव्हता. तेव्हा आपुल्या आपणात सांगून घेतला. हे असुयेचं फळ होय. मी माझ्या शेदारिल्यास घात न केला असतो तर. . . (खामखा ?) या वेळेस माझे शत्रूस येऊन मारून टाकितील. तैसे नसलिया त्याचे भयेकडून मला उपद्रव करू समजात की म्हणून मानिता जाला.

**११. काहणी अत्याशेविषई**

जो पुढे येणार यैशा लाभाते अपायेकडून वर्तमान स्थितीचा नासाडी करून घेतो की तो वेडा आणि भीकारी जाणावा आणि उदंड आशा करणेने व्यसनाचे उत्पन्न करीतो, म्हणूनही आम्ही नीट समजून असावे.

येक मंत्रज्ञ येक्या गृहस्थापाशी येऊन मी रूपे सोने करीन म्हणून सांगितला. त्याचे खरेपण समजून घ्यावयास त्या गृहस्थाने थोडे रुप्याचे तुकडे त्यापाशी आणून दिल्हे. तो सन्याशी मंत्रजप करावयास येक खाली घर पाहिजे, म्हणून सांगून येक्या ओस घरात घुसून, काही वेळ तेथे राऊन, बाहेर येऊन पहिले घेतले होते ते रुप्याचे नाण्य म्हणून आपल्याजवळ होते ते सोन्याचे नाण्य त्यास दिल्हे. तो ग्रहस्थ त्या सन्याशाच्या लटक्या मंत्रास मानुन फार दंग होऊन, तो त्याचे सपरिवारानिशी त्याची पुजा करून त्याशी सांगितले, जे अहो महाराज,

तुम्ही आम्हावर अत्यंत दया करून, आमचे घरी आहे ते अवघे रूपे अवघे सोने करून द्यावे.' तेव्हा तो सन्याशी बोलिला, असे तुमचे मनी आहे तर मला येक निराळे घर द्या. त्यात अखंड दिवा लावून मंत्र जप करावे लागते,' म्हणून त्या सन्याशानी सांगितले. ते ऐकून तुमचे आज्ञेप्रमाणे अवघेही सिद्ध आहे, म्हणून येक्या घरात त्या सन्याशास पाठऊन, आपले घरी होते ते अवघे रूपे त्यास ओपिला आणि आपण बाहेर येऊन दूर बसला होता. तेव्हा त्या सन्याशाने त्या ग्रहस्थास पुर्ता दगा करावा म्हणून आभास करीत होता. ते ऐकून त्याचे घरचे लोक फार संतोष मानून झोपी गेले. तेव्हा तो मंत्रज्ञ सूर्योदयाचे पूर्वी ते अवघे घेऊन पळून गेला. प्रातःकाळी त्या घर्चानी ते वर्तमान ऐकून व्यर्थ चिंतायुक्त होऊन, त्या सन्याशाची दगाबाजी आठवून रडू लागले.

त्याचे तात्पर्य काय म्हणालिया जे लोक दुसऱ्याचे दुर्बोधनेस पाते जातील की ते खरेच दगा पावतील आणि आपण आशा केलेल्या वस्तुची प्राप्त न होता अत्याशेकडून आपुल्याजवळ आहे त्या पदार्थासही हरऊन घेतील.

**१२. दुराशेविषई**

व्यर्थ दुराशेकडून काही काल पावेतो संतोष होयील पण शेवटी सार्थक नाही.

कोणी एक शिपाई बाजारास जाऊन येक मडकेभर तूप खरीदी करून ते तुपाचे मडके घरी आणावयाकरिता येक मजुरास चार आणे द्यावयाजोगे करार करून घेतला. तो मजूर ते तुपाचे मडके डोईवर ठेऊन घेऊन फार खुषीने आपल्या आपणात 'या मजुरीकडून येक बकरा विकत घेईन ते विता विता त्याची अभिवृद्धी होईल. त्याचा समय पाहून, ते अवघे विकून येक चांगल्या शेळीस खरीदी करीन. ती शेळी आल्यानंतरे तिचे दूध विकून जसे तसे कालक्षेप करीत असेन. रोज बरोज माझे शेळीचे कळप गर्भिवृद्धी होईल. त्यामुळे मी भाग्यवंत होईन. काही दिवसानंतरे वासरं उदंड होतील, त्यापैकी कित्येकास दोन-चार दात येताच त्याचा भारी किंमत येईल. याप्रमाणे मी उदंड भाग्यवंत होऊन सौंदर्यवती आणि सर्व लक्षण संपन्न यैशा चखोट बाइकोस वऱ्हाड करीन. नंतर एक-दोन वर्षांत मला लेकरे होतील. तेव्हा मी काही काम करीना. माझे चाकर सर्व काम करतील. तेव्हा मी राजासारिखा असेन यैसे असता माझा ल्योक अकस्मात येऊन 'बाबा जेवावयास येरे' म्हणून बोलावील. तेव्हा मी डोई हालवून 'मी आता भोजन करीत नाही' म्हणून सांगेन. याप्रमाणे मनाच्या मांड्या खात याप्रमाणे तजवीज करीत डोई हालवीला. तेव्हा ते तुपाचे मडके खाले पडून फुटून चूर होऊन गेले. ते पाहून त्या शिपायीने त्या मजुरास वेताने मारून त्याचा भुस पाडिला.

**१३. काहणी**

मायबाप व संरक्षण करणार आणि मुलाचे पंतोजी हे अवघेही मुलास जे जे काम शिकवले की त्या त्या वर्तमान भविष्य त्प्रयोजनाही, कार्य शिकविण्याविषईही त्या त्यानीच लावण्याचा संप्रदायही बुद्धिवादही सांगणे अत्यंत उचित असे. त्यानी यैशा कामाविषई

अजाग्रतेने अरुणेने ते त्याच्या नासाडीस ठाव दिल्यासारिखे होते. त्याविषयी येक कहाणी सांगतो ते ऐक.

येक रजपुताचा मुल मोठा शहाणा आपणास प्रभुत्व यावे म्हणून मातून कार्य निर्वाहाविषयी आपुल्यास उदंड सामर्थ्य आहे. अैसे चांग मनी राखुन कारभार अवघेही आपुले मारिफात करून बापानी उगीच राहावे, ऐसेही तो बाप खचला असता हे मनोरथ आपला घडना, करिता त्या बापास मारून समस्त सलतनत आपुल्या स्वाधीन करून घ्यावे म्हणून योजिता जाला.

या राजाच्या मंत्रीस अति सौंदर्यवती कन्या ती काही दिवसा शहाणी जाहली. पण तिचे लग्न जाले नवते करिता ती मंत्रीची कन्या विरक्त होऊन्न देशांतरी निघून जावे म्हणून सिद्ध होती.

ऐसे असता येक्या दिवशी संध्याकाळी सरकारवाडेत नाचरंग व्हावयाची तयारी होऊन्न, नाच होत असता बहुत वेळ पावेतो नाचूनही आपणास बहुमान मिळाले नाही, करिता ती कलावंतीण नाच राहते करावे म्हणून सांगितली. त्यानंतर तिचा यार जो तो याखाली लिहिजे ते वाक्य सांगता जाला.

'अगे सये, रात्री तर बहुतेक लोटली. थोडी रात्री उरली करिता आणीक थोडे वेळ पावेतो राहून तमाबा पहावयास आल्या लोकास तृप्ती कर. हे वेळपावेतो आम्ही ऐकले ते खरेच. हे वेळ पावेतो आम्हास काही मिळाले नाही. आम्हास इनाम मिळेल. म्हणावयाची आशा नसली तरीही आणीक थोडे वेळ राहून उजेडोस्तर नाचत गात राहून सभेचे लोकांस तृप्ती करू म्हणे.' म्हणून सांगितला तेव्हा या राजाचा ल्योक व मंत्रीची लेकही त्या वाक्याचा अर्थ समजून, सोसणूक सर्वदा फलदायक म्हणून समजून, कळवंतिणीच्या बोलणेस संतोष मानून ते दोघेही येकेक चिजेस मोत्याचा हार तिला दिल्हे.

या सभेत बसले होते त्यापैकी सभानाइकाचा ल्योक या पैक्याचा अर्थ न समजता बापाच्या तोंडावर मारिला. तो सभानायक त्याला आपुल्या खांद्यावर बसऊन्न घेऊन, त्या कळवंतीणीबरोबर नाचू लागला. तेव्हा त्या सभेचे लोक अवघेही आश्चर्य मानून 'पूर्वी तुला मारिला, नी तु आता कशास्तव खांद्यावर त्याला बसवून घेऊन्न नाचतोस' म्हणून पुसू लागले. 'यास या या प्रकारे चालावे म्हणून त्याला मी बुद्धिवाद सांगितले नाही, करिता तो वेडा जाला. माझा अदृष्ट चांगला होता. करिता माझा जीव घेतला नाही' म्हणून त्या सभानाइकाने सांगितले.

**१४. जो स्तोत्र करणार त्याविषई**

जो ज्याची योग्यतेहून अधिक स्तोत्र करितो की तो कोणतेही एक्या कारणामुळे स्तोत्र करितो. स्तोत्रासही तोंडासमोर गोड बोलण्यासही जे संतोष मानिता, तर ते दगा पावतील. याविषई धृष्टांत आहे.

येक भुकेला कोल्हा आहाराकरिता चहूकडे हुडकीत असता, तेव्हा अकस्मात

आपुल्यासमोर येकदा खडीस पाहिला. ते फार मृदुलही करिता आपुल्या खाणेस ते योग्य आहे, ते कसे धरावे, ते कळले नाही शेवटी त्या खडीते पाहून याप्रमाणे कोडे सांगितले ते, 'तुझा बाप आणि आजा दोघेही फार शहाणे. ते एकदा झाडातून दुसऱ्या झाडावर येक्या उडीने उडत होते. ते यैकून ते लहानखडी त्या क्षणी त्याप्रकारे उडाले. तेव्हा कोल्ह्याने सांगितले, 'तुझे बाप वगैरे येक्या उडीने झाडाचे फांदीवरून दुसऱ्या फांदीवर उडतील," तेव्हा ते (ने) करून खडीही त्याच्या वाखाणणेस मानून खाली उडी टाकिले. त्या क्षणीच तो कोल्हा त्यास गिळिला. पहा, एकजण आपुल्या कामाकरिता स्तोत्र करितो. ज्या ज्या कामास स्तोत्रे काट्या (?) सारिखे रुततात की तो कोणापासूनही दगा पावणार नाही. करिता स्तोत्रास कधीही वाटे जाऊ नये.

**१५. संतोषास्पद**

संतोष जो तो मनीच राहतो. पण भाग्याचे ठाई असमाधान. तल्लक्षण अरशात लोकांचे मन पहा. ते हे—

येक पंडित उदंड ग्रंथ वाचून अत्यंत ज्ञानवंत होऊन्न सर्वदा ब्रह्मविचार करीत होता. करिता त्याचे मन येकदा तरी संतोष पावले नाही. कोणाचे वर्तणूक तरी आपल्या वर्तणुकाप्रमाणे क्रूर असला म्हणून समजून सर्वदा असंतुष्ट होऊन्न राहण्यामुळे, त्यानी कोणास पाहिल्याही जीव मारावयास उद्युक्त जाहला.

तो येक्या दिवशी फार व्यसनभ्रांत होऊन्न झोपी जात असता स्वप्नात येक जणास पाहिला. तो याचा व्यसन परीहार करावे. म्हणूनच यास एक आरसा देऊन्न 'याकडून तुझे व्यसन अवघेही जाईल, कैसे म्हणालिया तू दुसऱ्याचे मनाते पाहशील. पाहून तुला कोणास तरी देअखावे (?) म्हणून वाटते की तसे राहू नये' म्हणून सांगितले.

या विद्वांसाने उदंड कृतज्ञतेमुळे तो आरसा घेऊन्न, नाचावयाचे ठिकाणी जाऊन्न, येथे उदंड जण घोडेवर स्वार होऊन्न, कितेक तसेच गाडीवर बसून कितेक पालखीमधून जाणार, ऐशा लोकांसही कितेक उदंड चाकर-नोकर सेवकजण वगैरे परीवाराशी सहवर्तमान जात असणार. ऐशा लोकांसही पाहून, त्या क्षणी आपुल्या चांगुलपणातेही पाहू लागला. ते त्या लोकाचे मनाचे स्थितीत कळविले.

**संदर्भ**

१. या संग्रहाची माहिती देणारा 'मराठी संशोधकांची दक्षिणेतील तीर्थक्षेत्रे' हा माझा लेख 'महाराष्ट्र टाइम्स'च्या दि. २६ सप्टेंबर १९९३ च्या रविवार आवृत्तीत प्रसिद्ध झाला आहे.

२. या कामी श्री. आर. पी. कुलकर्णी (कऱ्हाड) याचे बहुमोल सहकार्य मला लागले.

३. काव्यशास्त्रविनोदेन कालोगच्छति धीमताम् । व्यसनेषु च मूर्खाणां निद्रया कलहेन वा ॥

४.'मराठी व्युत्पत्ति कोश' पुणे,दु.आ.१९६४.
५.'गीर्वाण लघुकोश' पुणे शके १८३७.
६.'हंसकोश' पुणे.शके १७८५.
७.'The Practical Sanskrit English Dictionary', Poona, 1890.
८.मोल्सवर्थकृत 'मराठी-इंग्रजी शब्दकोश' पुणे १९७५.
९.'विनोदगाथा' (पृ.३) मुंबई १९७०.
१०.उपरोक्त.
११.'चर्वणा' (पृ.४६) पुणे.
१२.'हास्यविनोदमीमांसा' (समग्र केळकर वाङ्मय-खंड १२ तत्त्वज्ञान खंड) पृ.३०३.
१३.तत्रैव (पृ.३२३)

**टीपा**

**काहणी १**– १. कडून– ती (तृ) २. रुजू करणे– खात्री पटविणे (रुजवात) ३. नव्हता– अन्यथा,परष्टी,४.भोईदर– जमिनीवर.

**काहणी २**– १.तबदीन (ल)– बदललेला, परिवर्तन झालेला. २. रांधरुणी– स्वयंपाक, ३.खुणा– मार्गदर्शक चिन्ह.

**काहणी ३**– १. असना– असत नाही., २.प्रसिद्ध केले– जाहीर केले. ३. ओपणे– देणे, सोपविणे.४.मावना– मावत नाही.

**काहणी ४**– १.प्रयाण होऊन– प्रवासास निघालेला २.समोर येणार– समोरून येणाऱ्या ३.भल्या– करिता नम्रतेने असून– स्वार्थासाठी नम्र झालेला.४.अटकाव...म्हणिजे. ..यामुळे अटकाव येतो असे म्हणआवे का ? ५.वाकफ(ब)गार.परिचित ६.वहाडत– वाढत ७.व्यसन– संकट.८.अधृष्ट- नशिब,प्रारब्ध.९. ओवून घेतो– स्वीकारतो. १०.रबडी– साय. ११.नाजूक-साजूक. १२.असल्याने-असतानाही. १३.मातारी– म्हातारी, वृद्ध स्त्री. १४. त्यासी सांगितला– त्याला म्हणाला १५.काहडून– काढून, १६.मात्केन– पुनः.

**काहणी– ५** १.दगावाज– विश्वासघातकी. २.वऱ्हाड करणे– विवाह करणे. ३. खिजमतगार– सेवक. ४. हरकारा– (फा) जासूद, वार्ताहर ५. सोयेंधार्ये– नातेवाईक.

**काहणी ६**– १. दाहण्याकडून– दाह दिल्यामुळे, जाळल्यामुळे. २. ग्रहचारामुळे– ग्रहदशेमुळे.३.भरमगदूर– मगदुराप्रमाणे.

**काहणी ७**– १.मेहनत– कष्ट.२.तमाम– सर्व,संपूर्ण.खांडिले– खणले.३.नजर– दृष्टीस, ४.मात्केन– पुन्हा.



अनुक्रमणिका

**काहणी ८–** १. व्यसन– वाईट सवय. २. विनोद– रंजन, करमणूक.

**काहणी ९–** १. वळीहल्ली– वस्त्रपात्र, दानधर्म, २. करज– कर्ज, ऋण, ३. देवमानव– देवमाणूस.

**काहणी १०–** १. दूरधृष्टास– नशिबास, भाग्यास २. असोशी– अतृप्ती, हाव. ३. मोड– कोंब, अंकुर. ४. शेदारल्यास– शेजाऱ्यास. ५. अस्केही– सगळे, संपूर्ण.

**काहणी ११–** १. अत्याशा– अतिलोभ. २. नाण्य– नाणे. ३. घर्चानी– घरच्यांनी.

**काहणी १२–** १. सासात– सहा-सात, २. चखोट– चांगली. ३. वऱ्हाड– लग्न. ४. मातून– माजून.

**काहणी १३–** १र. मारिफात– मार्फत. २. सलतनत– राज्य, ३. यार– प्रियकर. ४. तमाबा– खेळ.

**काहणी १४–** १. स्तोत्र करणार– स्तुतिपाठक. २. खडी– चपळ प्राणी, खार. ३. मृदुजडी– कोवळा, मऊ.

(१७३०, ई, सहावी गल्ली, राजारामपुरी, कोल्हापूर ४१६००८.)





अनुक्रमणिका






डॉ. अरविंद वामन कुळकर्णी

# पु. शि. रेगे यांची 'सावित्री' : एक मूर्त स्वात्मसाधनाबंध

पु. शि. रेगे यांची 'सावित्री' ही कादंबरी पत्रात्मक पद्धतीने लिहिलेली आहे. कादंबरीतील सर्व ३९ पत्रे सावित्रीची असून ती तिने तिच्या प्रियकराला लिहिलेली आहेत. लिहिणाऱ्याचा समग्र आत्माविष्कार साधू शकण्याची मोठी शक्यता असणारी पद्धती म्हणजे प्रांजळ पत्रलेखनपद्धती असे मुळातच म्हणता येते. आणि सावित्रीचे हे पत्रलेखन तर आरस्पानी म्हणावे असे आहे. लेखनाची अत्यल्पाक्षरी आणि चित्रमयी धाटणीही खास तिची म्हणावी अशी उतरलेली असल्याने इतरेजनांना ती अपरिचित वाटली नाही तरच आश्चर्य ! हिला 'आत्म'कथा म्हणावे की 'प्रेम'कथा, असाही एक प्रश्न यातून उभा राहू शकतो. कारण कादंबरीचा एकूण व्यूह आणि पत्रांद्वारे त्याचे घडत जाणारे दर्शन संकेतातीत असेच आहे. त्यातच ही पूर्णार्थाने मनमोकळी आणि स्वतःचाच शोध घ्यायला निघालेली आनंदभाविनी सावित्री आहे. त्या जुन्या पौराणिक सावित्रीशी जुळणारी आणि न जुळणारीही. सारखीच सामर्थ्यवान, पण सत्यवानाला खेचून आणणारी असली तरी पार सत्यवानमय न झालेली ! स्वतःचे खास असे वेगळे आत्मभान राखणारी !

तेव्हा अगदी नितळपणे साकार होत जाणारे असले, तरी सावित्री हे– किंवा त्यामुळेच बनलेले– एक व्यामिश्र गुंतागुंतीचे व्यक्तिमन आहे. तिचे विचार, वर्तन, भाषा आणि एकूण जीवनसरणी नुसतीच सूक्ष्म व तरल नाही, तर शब्दशः अथांग भासेलशी आहे. तिला नेमके काय हवे याचा शोध तिच्या प्रियकराला लागत नाही; तर ती नेमकी काय आहे याचा शोध वाचकाला लागत नाही.

तर्कगत कार्यकारणभावांच्या आडाख्यावर तिच्या कृतिउक्तींची, मनाची संगती लावणे अशक्यप्राय होऊन बसते. मग अशी संगती लावण्यासाठी तिच्या अन्तर्मनाचा शोध आवश्यक ठरतो. आणि तशी एक सूचना खुद्द सावित्रीच्या एका पत्रातूनच मिळते. ती लिहिते, 'तुमच्या मानसशास्त्रीय परिभाषेत मीही बोलू शकते. माझ्या स्वतःच्या वागण्याची एक सोयीस्कर शास्त्रपूत मीमांसा लावून दाखवू शकते. आईशिवाय मी लहानपणापासून वाढलेली, तेव्हा बापाबद्दल माझ्या मनात एक अधिक उत्कट आसक्ती. ही आसक्ती-हे father fixation- म्हणजे परपुरुषाबद्दल तितकंच आकर्षण कमी. याच भूमिकेवरून मग तुम्ही माझ्या ल्योरेविषयीच्या भावनेची संगती लावू शकाल, आणि थोडं पुढे जाऊन बीनाविषयीच्या माझ्या मातृभावनेचंही स्पष्टीकरण करू शकाल ... पण हे सर्व खरं मानलं



अनुक्रमणिका



तरी यानं आपला प्रश्न सुटेल का?' यामुळे सावित्री म्हणते तसा तिच्या प्रियकराचा प्रश्न सुटणार नाही. क़दाचित् तिच्याबाबत निर्माण होणारा वाचकांचा प्रश्नही पूर्णपणे सुटणार नाही. पण मानसशास्त्रीय सूत्रांच्या आधारे काही प्रमाणात का होईना तिच्या मनाचा शोध घेण्याचे काम सुकर होऊ शकेल असे म्हणता येईल.

फ्राईडच्या सूत्रांनुसार 'सावित्री'ची संगती जरूर लावता येते. तसा प्रयत्न पुढे केलेलाच आहे. पण प्रारंभीच हे लक्षात घेणे जरूर आहे की, फ्राईडची सूत्रे पुरेशी पडत नाहीत. युंगची सूत्रे त्याबाबतीत जास्त मदत करणारी ठरतात.

प्राधान्येकरून प्रस्तुत कादंबरी म्हणजे सावित्रीच्या नेणिवेचेच विश्व आहे. दुसरे महायुद्ध वगैरेसारख्या तपशिलात्मक घटनांच्या निर्देशापुरते ते जाणिवेच्या किंवा तर्काच्या पातळीवर येते. बाकीच्या सर्व ठिकाणी तर्काला चकविणारी नेणीवच 'दृश्य' होत जाताना दिसते.

मुळात सावित्रीचे मन हे एक सुसंस्कारित मन आहे. ती आईवेगळी असली, आणि आईच्या म्हणून होणाऱ्या संस्कारांना पारखी झालेली असली तरी व्यासंगी वडिलांच्या– अप्पांच्या– संस्कारांनी तिचे मन संपन्न झालेले आहे. तिचे एकूण व्यक्तिमत्त्वच यामुळे (थोडेफार अकाली म्हणू अशा वयातच) कमाविले गेलेले आहे.

तसेच बाळपणी किंवा बाळपणानंतर तिच्यावर अनुभव दडपण्याचे (Suppressionचे) प्रसंग आलेले दिसत नाहीत. एका पूर्णपणे मुक्त अशा पर्यावरणात तिचे मन वाढलेले असल्याने तिच्या नेणिवेत विविधतेची गुंतागुंत नाही. तिच्या एकूण मनाचा कल अंतर्मुख (Entrovert) असल्याने नेणिवेची खोली आणि उत्कटता मात्र जाणवावी अशी आहे. लक्षात यावेत असे ठळक विकार, प्रेरणा, प्रवृत्तींच्या नेणिवेतील अनुपस्थितीमुळे तिच्या मनाचा एकूण आविर्भावही फिका, अ-लक्षणीय असा झालेला दिसतो. त्यामुळेच थांग लागावा अशी ठळक, ठाशीव सूत्रे या मनाचा शोध घेताना हाती लागत नाहीत.

मानसशास्त्रीय परिभाषेत सांगायचे तर तिच्याबाबतीत Super Ego चा, म्हणजे 'अत्यहं'चा प्रभाव विशेष कार्यकारी झालेला आहे. इतका की, त्यामुळे id, म्हणजे 'तत्'च्या क्षेत्रातील मूळ प्रवृत्ती, प्रेरणा वा गंड हेही निष्प्रभ झालेले आहेत.

या मनात 'अहम्‌गंडा'चे, Ego complex चे अस्तित्व आहेच. 'प्रो. गुरुपादस्वामींनी एकदा तुमच्या बक्षिसाच्या निबंधाचा वर्गात उल्लेख केला होता. तुमची त्यांनी स्तुतीही केली. पण दरवर्षी हे बक्षीस कुणाला तरी मिळतं, त्या वर्षी ते तुम्हाला मिळाले एवढाच मी त्यातून अर्थ काढला. तुम्ही कदाचित आमच्याच वर्गात असता, तर या बातमीनं अधिक कुतुहल जागृत झालं असतं! पण तुम्ही पोस्ट-ग्रॅज्युएट स्टुडंट, आम्ही नुकताच कॉलेजात प्रवेश केलेला. गुरुपादस्वामी चांगलं शिकवतात, नाही? तुम्हाला सांगायला हरकत नाही,

– मी फर्स्ट इयरच्या परीक्षेत त्यांच्या हातून तितक्यातले तितके मार्क मिळविले आहेत...' अशा लेखनातून तो सहजगत्या दिसून येतो. अशा इतरही जागा सापडू शकतील. पण तिचा हा अहम्‌देखील अत्यहम्‌ने नियंत्रित असाच आहे. त्यामुळे त्यालाही जाणवेल न जाणवेल अशी एक तरलता प्राप्त झालेली आहे. सार्वत्रिकता तर आहेच आहे. या कादंबरीतील प्रत्येक पत्रावर खास सावित्रीचा सहजगत्या जाणवेल असा जो ठसा दिसतो त्याचे मूळ तिच्या या अहम्‌गंडातच सापडते. पण हा अहम् मात्र अत्यहम्‌ने वेष्टित किंवा प्रभावित असाच !

कामप्रेरणा तर प्रस्तुत कादंबरीच्या सर्व व्यूहाचीच मूलाधार आहे. पण तिचेही आविष्कृत रूप फार वेगळे दिसते. एक तर सावित्रीच्या ठिकाणी असणाऱ्या Father fixation मुळे, म्हणजे पितृगंडामुळे इतर पुरुषांबद्दलचे (तीच म्हणते त्याप्रमाणे) आकर्षण मुळातच कमी आणि त्यातही जोरावलेला अत्यहम्. त्यामुळे तिच्या कामगंडात एक वेगळीच समावेशकता निर्माण होऊन त्याच्या कक्षा रुंदावलेल्या दिसतात. या स्वरूपाच्या कामगंडाचे मराठी साहित्यात इतरत्र दर्शन घडत नाही असे म्हणावेसे वाटते. हा गंड इथे त्याच्या ऐंद्रिय कडा राखूनही खऱ्या अर्थाने 'कामा'च्या म्हणजे 'इच्छिण्या'च्या आणि 'इच्छित' आत्मसात करण्याच्या पातळीवर गेलेला दिसतो. ही आत्मौपम्याची पातळी असेही म्हणता येईल. 'मोर हवा तर आपणच मोर व्हायचं. जे जे हवं ते ते आपणच व्हायचं' हा त्याचाच शाब्दिक आविष्कार. याच्या जोरावरच ल्योराला नुसते तिच्या अन्तर्विश्वात स्थान लाभत नाही, तर समरूपत्वच लाभते. हा सारा आत्मविस्ताराचा आणि आत्मसमावेशकतेचा मामला आहे. 'माझ्या जागी तिला (ल्योरेला) समजा' असे सांगणेही यातूनच संभवलेले. बीनाच्या बाबतीत असणाऱ्या मातृभावनेची निर्मितीही यातूनच झालेली !

एजवर्थ ही मानसशास्त्रदृष्ट्या आप्पा या व्यक्तिरेखेपेक्षा लक्षणीय अशी व्यक्तिरेखा आहे. सावित्रीच्या संदर्भात ती आप्पाशी समकक्ष आहे. त्यामुळे तीही पितृगंडाच्या कक्षेत येते. मुख्य म्हणजे निव्वळ व्यासंगाशी समरूप झालेल्या आप्पांच्या दर्शनापेक्षा एजवर्थचे दर्शन खूपच 'मानवी' (human) असे आहे. या व्यक्तिरेखेबाबत जाणवते ते ॲनिमा आणि ॲनिमसचे सूत्र. अनुक्रमे प्रत्येक पुरुषात वसणारे स्त्रीत्व आणि तसेच प्रत्येक स्त्रीत वसणारे पुरुषत्व. या एजवर्थला पुढचा जन्म कुर्गी स्त्रीचा घ्यावासा वाटतो, हे या दृष्टीने मोठे अर्थपूर्ण आहे. त्याच्यातही एक 'सावित्री (म्हणजे daughter-) fixation' आहे. आप्पांच्या नंतर तोही कालवश होतो. (सावित्री यानंतरच खऱ्या अर्थाने मुक्त होते !) मृत्युपत्राद्वारा तो आपली सर्व मिळकत सावित्रीलाच देतो. (इथे खरे तर ती न देणेच अनैसर्गिक झाले असते !)

सावित्रीच्या ठिकाणी भिन्न लिंगियाबद्दलचे आकर्षण आहेच. तिच्या सर्वच पत्रांतून एक अंतःस्राव म्हणून ते पाझरताना जाणवते. त्याची वाट पाहणे, तो आला नाही म्हणून कष्टी होणे, तो येऊन गेल्याने पराकाष्ठेचा आनंद होणे इ. सर्व भाग तिच्या या आकर्षणातूनच

जन्मलेले आहेत. २१ क्रमांकाच्या पत्रात तर त्याच्याबद्दलच्या या आकर्षणाची जाणीव काव्यरूपात, म्हणजे नितळ पारदर्शी अनुभवकथनाच्या स्वरूपात व्यक्त झालेली आहे. अशा आकर्षणाचा तिला आधी आलेला एक अनुभवही तिची नेणीव त्याच्यापासून दडवून ठेवीत नाही. प्रतिमांच्या भाषेत ती व्यक्त होते. पत्र क्रमांक ४ मधील सात ओक्कांच्या टेकड्यांतील मैत्रिणीच्या भावाबरोबर अनुभवलेला भुलभुलैय्या ही पौंगडावस्थेतील आकर्षणाचीच (Calf love) एक झलक आहे. हा अनुभव मोठ्या सूचकतेने व्यक्त केल्यावर 'माझ्या साध्या लिहिण्याचा तुम्ही भलताच तर नाही ना अर्थ केला ? मला उगाच भीती वाटते. मी लिहिलं ते सर्व विसरून जावं' असे त्यानंतरच्या पत्रात ती लिहिते. त्याचे पत्र आल्यानंतरच्या उत्तरात लिहिते, 'तुमच्या कालच्या पत्रानं मला खूप धीर आला. माझी सारी भीती निरर्थक होती तर !' याबरोबरच 'आता मला एकदम इकडे करमेनासं झालं आहे. तुम्हाला थोडे दिवसांसाठी इकडे नाही का येता येणार ?' हेही लिहिलेले आहे. आणि शेवटी तर लालूच दाखवल्यागत हे नेणिवेतील आकर्षण असे व्यक्त होते, 'तुम्ही या. मी पर्यटनसहायक होईन.' म्हणजे नेमके काय असे खोलात उतरून कोणी पुसलेच, तर निःसंकोचपणे सावित्रीची नेणीव म्हणेल, 'पर्यटन म्हणजे कामनगरीचे पर्यटन. दुसरं काय असणार ?'

म्हणूनच पुढे एका पत्रात ही नेणीव अशी प्रकट होताना दिसते, 'तुम्ही मला उचलून, ओढून न्यायला हवं होतं– होय, हे मी अगदी खरं खरं लिहिते आहे.' यामुळेच ती तुलनेसाठी (यातून जमल्यास त्याचा मत्सर जागा करण्यासाठी) प्रा. जोशी या चलाख पुणेरी प्राध्यापकाचे व्यक्तिदर्शनही घडवते. जोशी हे तसे सर्वगुणसंपन्न असूनही तिच्या कामप्रेरणेला उत्तेजित करू न शकलेले केंद्र ! पण असे असूनही तिचा अहम्‌च तिला तिच्या प्रियकरापासून दूर ठेवताना दिसतो. याच ३५ व्या पत्रात ती लिहिते, 'मला जो प्रतिसाद हवा होता तो मिळाला नाही. तो मिळाला असता तर मी तुमच्याबरोबर कुठंही आले असते, तुमच्यासाठी काहीही केलं असतं.' पुढे लगेच यावर 'जन्माला येतानाच प्रत्येक मुलगी आपल्या आईला आणि बापालाही सोडण्याची तयारी करून आलेली असते' अशी टिप्पणीही तिचा अत्यहम् करतो.

याच पत्रात प्रारंभी तिने लिहिलेला मजकूरही तिच्या मनोदर्शनाच्या दृष्टीने अर्थपूर्ण असाच उतरलेला आहे. ती लिहिते, 'तुम्हाला प्रेम हवं आहे, आणि मला नको आहे का ? मी सहा वर्षं तुम्हाला काय दिलं ? मी फक्त मला जे हवं होतं– अजूनही हवं आहे– त्याच्या नावात गुरफटून राहिले नाही इतकंच. तुम्ही मला उचलून, ओढून न्यायला हवं होतं,– होय, हे मी अगदी खरं खरं लिहीत आहे. विश्लेषणानं काहीच साधत नाही. आपण आपणालाच पारखे होतो.'

तिला तिचे आत्मरूप वाटणाऱ्या बीनाला त्याने पत्र लिहावे, असा तिचा आग्रह आहे.









ल्योरेने (स्वतःतच पार निमग्न असणाऱ्या) 'नार्सिसस् आणि एको' यांचे कथानक तिला बॅलेसाठी सुचविलेले असल्याचे ती आवर्जून सांगते. 'मला एकेकदा वाटतं की, आता आपली भेट व्हायचीच नाही... नाही झाली तर मीच ल्योरे म्हणून समजा' असे लिहितानाच ती पुढे ३६ व्या पत्राव लिहिते, 'बीना तुम्हाला लिहिणार म्हणते, ..' ल्योरेलाही तुम्हाला लिहायला सांगू का?... मग मात्र तुमची सगळीकडून कोंडी होईल.' असे लिहिल्यावर तिचा कामजन्य मत्सर जागा होऊन ती कंसात पुढील शब्द लिहिते, 'की ती लिहितेच आहे तुम्हाला?'

पण सावित्रीच्या या गंडावरही तिचा अत्यहम् प्रभाव राखून आहे. त्यामुळे तोही स्वयंप्रेरणेने फोफावेल तसा फोफावत नाही.

* * *

सावित्री म्हणजे समग्रतेची ओढ असलेल्या व्यक्तिमनाची साकार, शब्दरूप झालेली स्वात्मसाधनेची प्रक्रिया– Individuation Process– आहे असे दिसते, या सर्व प्रक्रियेचे विवेचन डॉ. म सु. पाटील यांनी 'नवसमीक्षा' या ग्रंथात आदिबंधांचे स्वरूप स्पष्ट करताना चांगल्या तऱ्हेने केलेले आहे.

कार्ल युंग मानवी मनाचे जाणीव (Consciousness), वैयक्तिक नेणीव (Personal Unconsciousness) आणि सामूहिक नेणीव (Collective Unconsciousness) असे तीन स्तर कल्पितो. त्याच्या मते जाणीवयुक्त मन इतर दोन स्तरांच्या मदतीने प्रतिमा– प्रतीकांची निर्मिती साधीत असते. व्यक्तिगत इच्छाआकांक्षांनी युक्त अशा वैयक्तिक नेणिवेच्या पातळीशी घातलेल्या मेळातून होणारी निर्मिती दिवास्वप्नासारखी होते. ती समग्र व्यक्तिमनाचा आविष्कार साधू शकत नाही. आणि माणसाला तर समग्रतेची ओढ असते. त्यासाठी जाणिवेला सामूहिक नेणिवेच्या स्वराशी जुळवून घ्यावे लागते. आणि हे करताना त्या व्यक्तीला आपल्या व्यक्तित्वाची फेररचनाच करावी लागते. यात ते व्यक्तित्व अधिकाधिक सुजाण, समृद्ध व अर्थगर्भ– म्हणजेच पक्व होत जाते. यालाच युंग 'स्वात्मसाधनेची प्रक्रिया' असे म्हणतो.

सामूहिक नेणिवेचे क्षेत्र हा मातृकोष होय. तो पूर्णपणे सहजप्रवृत्तींनी युक्त असा आहे. माणसाचे मूळ निसर्गसिद्ध रूप त्यात सामावलेले आहे. हे सर्व क्षेत्रच आदिम आणि चैतन्यमय आहे. शारीरदृष्ट्या ही बाल्यावस्था म्हणता येईल. पुढे माणूस सामाजिक व्यक्ती किंवा त्याच्या समाजाचा एक घटक म्हणून जगू लागतो. तेव्हा या आदिम क्षेत्राचा त्याच्या विचार वा वर्तनावरील प्रभाव कमी होत जातो. समाजमान्य आचार-विचार, चालीरीती, परंपरा यांना प्रतिसाद देत तो सांकेतिकतेत गुरफटत जातो. सहजप्रवृत्तींनी युक्त अशा मातृकोषाशी, त्या चैतन्यमय निर्मितिकेंद्राशी असणारा त्याचा संपर्क संपुष्टात येतो. जाणिवेच्या पातळीवरील त्याचे असे परंपरामान्य संकेतशरण जीवन म्हणजे पितृकोषातील

जीवन होय. यात माणसाची निर्मितिक्षमता कुंठित व्हायला लागते. अशा आवर्तात सापडलेला माणूस आणि त्याचा समाज चैतन्यहीन आणि स्थितिशीलही व्हायला लागतो. ही चाकोरीबद्ध चौकटीची कोंडी उमगलेल्या जाणिवेला हरवलेल्या चैतन्याच्या आणि निर्मितिक्षमतेच्या प्राप्तीसाठी पुन्हा त्या आदिम सहजप्रवृत्तिमय मातृकोषाकडे वळावे लागते. एक नवा प्रतीकात्मक जन्म घ्यावा लागतो. ही जाणिवेचा स्तर आणि सामूहिक नेणिवेचा स्तर यांच्या मेळाची परिणती होय.

आप्पा, एजवर्थ आणि त्यांच्या अनुषंगाने जे जे येते त्या साऱ्यांतून उभा राहतो तो सावित्रीचा पितृकोष, त्याद्वारा स्पष्ट होत जातो तो तिच्या भद्र संस्कारजन्य व्यक्तित्वविकसनाचा आलेख. साधारण किंवा असाधारण अनुभवांच्या डोळस स्वीकाराने व्यक्तित्वसंपत्र होत जाणारी, स्वतंत्रपणे अनुभवांची संगती लावीत विकसनक्षम जीवन जगू पाहणारी आणि प्रत्यक्षात स्वतःच्या कलाने जाणारी सावित्री या कादंबरीतील पत्रांतून साकार होत जाते. यामुळेच तिचे घडत जाणारे दर्शन जसे अनपेक्षित आहे तसेच ते असांकेतिक असेही आहे. नैसर्गिक रिवाजांना प्राधान्य देऊ पाहणारे आहे. त्यांच्या आधारावरच स्वतःचे नव्याने पुनर्गठन करू पाहणारे आहे.

'मी कशी वाढले ते माझं मलाच ठाऊक नाही,- आईविना आणि सदा कामात गर्क असणाऱ्या आप्पांच्या सान्निध्यात' असे पहिल्याच पत्रात लिहिणारी सावित्री ही मातृकोषाला फार लवकर दुरावलेली आहे. नैसर्गिकरीत्या सहजप्रवृत्तींच्या कलावर होणारी प्राथमिक, पण आवश्यक वाढ तिच्याबाबतीत झालेली नाही. म्हणूनच ती नंतर म्हणते, 'मी पहिल्यानं काय शिकले असेन तर स्वतःला विसरायला' तिचे 'मोर हवा तर आपणच मोर व्हायचं. जे जे हवं ते ते आपणच व्हायचं' हे तत्त्वज्ञान यामुळेच स्वतःकडे वळविणाऱ्या प्रक्रियेतून वाढीला लागलेले आहे.

'मागचं आठवत नसतं आणि पुढच्याचा सोस नसता तर किती बरं झालं असतं', 'माझ्याबद्दल मी काहीच लिहिलं नाही म्हणून तुम्ही म्हणाल. पण मी अजून भोवताली पाहतेच आहे', '(एजवर्थच्या पत्रातील काही भाग पत्रात टिपल्यानंतर) मी यावर कोणतं भाष्य करणार? मला फक्त एकच ठाऊक आहे की, ज्यात कदाचित या सर्वांचा समावेश होऊ शकेल : स्वतःला विसरणं. हे साधलं की स्थलकालादी बंधनंच उरत नाहीत. पूर्वी कुणी याला 'समर्पण' म्हटलं; एजवर्थ तेच निराळ्या भाषेत सांगत आहेत,' 'स्वतःला विसरणं म्हणजे काय, याची खरी प्रचीती मला तिच्या (ल्योरेच्या) संगतीत आली. लहानपणी मला एकेकदा दुसऱ्यासारखं व्हावं असं खूप वाटायचं. मग एकदा माझ्या मनात विचार आला की, ते दुसरं माणूस 'दुसरं' कशावरून, आपणच का नाही? मला मग या खेळात खूप गंमत वाटायची. मी वेगवेगळी रूपं घेई. स्वतःकडे दुसऱ्याच्या दृष्टीनं पाही. लहानपणचा हा अनुभव केव्हाच विरून गेला होता. लहानपण संपल्यावरही हा अनुभव उलगडून

दाखविणारी अशी ही ल्योरे आहे'– वर्तमानकालस्थित स्वतःच्या विसर्जनाबद्दलचे सावित्रीच्या पत्रात विखुरलेले असे उल्लेख तिच्या मातृकोषाच्या ओढीच्या दृष्टीने अर्थपूर्ण आहेत. राजम्मा आणि तिचे विश्व हा मातृकोषाचा व्यूह, तर ज्याला सावित्री पत्रे लिहिते आहे आणि ज्याने तिची कामप्रेरणा चाळविली आहे असा 'तो' तिच्या या 'स्वात्मशोधा'च्या प्रक्रियेतील प्रमुख सूत्र वा आधार आहे असे जाणवते.

लच्छी आणि मोर (अत्यहम्), 'गाणारं झाड' हे नाटक (अहम्) 'चौर पञ्चाशिका' हा बॅले (कामप्रवृत्ती) यांना प्रस्तुत कादंबरीत प्रतिमांचा दर्जा लाभलेला आहे. आणि त्या प्रतिमा प्रस्तुत प्रक्रियाच आविष्कृत करताना दिसतात. कादंबरीच्या प्रारंभी राजम्माने सांगितलेली लच्छी आणि मोर यांची कथा आहे. पण ती सरळ निवेदनात्मक स्वरूपात. कादंबरीच्या अखेरीसही तीच कथा येते. पण वेगळ्या दृश्य स्वरूपात तिची सूचना आहे. निमित्त आहे 'एजघरा'च्या उद्घाटनाचे. सावित्री सांगते, तेव्हा 'राजम्माच अखेर आमच्या कामाला उपयोगी पडली.' तिच्या त्या लच्छीच्या गोष्टीवरील नाचाचा प्रयोग त्या वेळी करायचा आहे. त्याला 'पार्श्वसंगीत, पार्श्वशब्द राजम्माचे' आहेत. म्हणजे आधारभूत अशा पार्श्वभागी राजम्माच आहे. आणि त्या प्रयोगात बीना, ल्योरे, स्वतः सावित्री आणि 'तो' असा सर्वांचा सहभाग अपेक्षित आहे. 'त्याच्या'कडे तर मोराची भूमिका दिलेली असून त्याला 'नाचण्याचे संपूर्ण शिक्षण देण्याची व्यवस्था' करण्यात येणार आहे. आणि या प्रयोगासाठी जी तारीख ठरलेली आहे ती आहे १५ ऑगस्ट १९४७. या दिवसाला 'स्वातंत्र्यदिन' अशा अर्थाचा एक वेगळा संदर्भ आहे. इथून पुढे भारतावरील परकीयांची पकड नाहीशी होऊन त्याच्या स्वाभाविक क्रियांना वाव मिळणार आहे. आणि हा अर्थ सावित्रीला अभिप्रेत असणाऱ्या मुक्तविकसनालाही मदत करणारा ठरतो. (म्हणजे आता तिचे बद्ध विकसन संपुष्टात आले !)

मेजर अग्निमित्र सेन हा– बंगाली– भारतीय डॉक्टर आणि एक जपानी नर्स यांचे लग्न, त्यांना बीनासारखे झालेले अपत्य, त्या उभयतांचा मृत्यू, त्यातही मेजर सेन यांचे अचानक नाहीसे होणे या कादंबरीत सांगितल्या गेलेल्या घटनांनाही एक वेगळाच संदर्भ या पत्रांतून प्राप्त होताना दिसतो. या घटना नेताजी सुभाषचंद्र बोस आणि जपान यांच्या प्रत्यक्ष स्वातंत्र्यलढ्यातील हातमिळवणीचे सूचन करतात. बीनाचा ज़न्म म्हणजे स्वातंत्र्याची चाहूल आणि तिचे संगोपन सावित्रीसारख्या सामान्य भारतीयाच्या हाती येणे ही कादंबरीगत वस्तुस्थितीही या संदर्भात अर्थपूर्ण ठरते. यापेक्षाही, आप्पा आणि एजवर्थ यांच्या मृत्यूने पितृकोष ढिला होऊन खिळखिळा होत चाललेल्या सावित्रीचा अंतःसंघर्ष आणि भारताच्या सीमेवरील युद्ध या कादंबरीच्या दोन ताणांतील संवाद विशेषत्वाने जाणवेल असा आहे. यानंतरच सर्वार्थाने स्वतंत्र झालेले सावित्रीचे मन (याआधी उल्लेखिलेल्या) ३५ व्या पत्रात स्वतःची कैफियत सादर करते आणि ३७ व्या पत्रापासून 'माझा हरवलेला गिटार मी पुन्हा वाजवीत आहे. . . राजम्माच्या मांडीवर डोकं टेकून मी तिची नवी सुधारलेली गोष्ट ऐकत











आहे. . . जपानहून परत आल्यावर पुन्हा दारातला बहरलेला चाफा मी पाहत आहे' असे सांगत पुढील पत्रातून स्वातंत्र्याचा मुक्त आनंद उधळते आहे.

'. . . स्त्रीप्रतिमेत, मातृप्रतिमेत वा वृद्ध आप्ताच्या प्रतिमेत अवतरणाऱ्या पात्राभोवती एक गूढतेचे वलय असते. ती बरीचशी तर्कातीत वाटते. 'त्यांचे सारेच काही कळते असे नाही' हे डॉ. म. सु. पाटील यांचे मत सावित्रीला लागू पडणारे आहे. (याचा निर्देशही त्यांनी केलेला आहे.) राजम्मा, ल्योरे, बीना ही तिच्या सहजप्रवृत्तींचीच चित्ररूपे आहेत. तसेच तिच्याबाबतीत 'ॲनिमस्'चे (स्त्रीमधील पुरुषप्रतिमा) सूत्रही विशेपत्वाने जाणवणारे आहे. 'या प्रतिमेच्या मुशीत ती तिच्या सहवासात येणाऱ्या पुरुपांचा अनुभव घेते, त्यांच्यावर ही प्रतिमा प्रक्षेपित करते.' आप्पा, एजवर्थ, नामुरा अशा 'वृद्ध आप्त' किंवा 'गुरू'च्या रूपाने सावित्रीची ही प्रतिमा आविष्कृत होते. तर 'त्याच्या'बाबतीत ती 'जिवलग मित्र' किंवा 'त्राता' या रूपाने प्रकट होते असे म्हणता येईल.

* * *

प्रस्तुत कादंबरीतील कुर्ग आणि जपान हे स्थलविभागही नुसती भौगोलिक स्थले म्हणून आलेली नाहीत. ती म्हणजे सावित्रीच्या नेणिवेतील विसाव्याची स्वर्गस्थले आहेत. कुर्ग ही निलगिरी पर्वतराजीतील निसर्गरम्य भूमी, तर जपान हा उगवत्या सूर्याचा प्रसन्न देश– दोन्ही अगदी 'आनंदभाविनी' स्थळे ! तिच्या नेणिवेत रुजलेली ! !

कलानिर्मितीच्या प्रेरणांचा चर्चेच्या रूपात शोध घेण्याचे काम प्रस्तुत कादंबरीत सावित्रीचा अत्यंहम् करताना दिसतो. अल्पकाल टिकणाऱ्या (गणेश वा दुर्गा अशा) मूर्तींच्या निर्मितीतही कलावंत आपले कसब ममत्वामुळे पणाला लावतो हे सावित्रीचे मत कलावंताच्या अहम्‌गंडावरच बोट ठेवते. 'अनुभव आणि विकसन' की 'अनुभवः विकसन' (अनुभव म्हणजेच विकसन) या वादात दुसऱ्या अर्थाच्या बाजूने पडणारा कौल तर सावित्रीच्या रूपानेच मूर्त होतो.

तिरूपेटहून पत्रलेखनाला प्रारंभ होतो आणि तिथूनच लिहिलेल्या पत्राने 'सावित्री' या पत्रात्मक कादंबरीची अखेर होते. म्हणजे वर्तुळ पुरे होते. जाणीव जाणिवेत आणि नेणीव नेणिवेत विरून जाते.

'सावित्री' या कादंबरीचे श्रेष्ठकनिष्ठत्व जरी अशा मानसशास्त्रीय मीमांसेच्या आधारे स्पष्ट करता आले नाही, तरी सावित्री या व्यक्तिमनातील अंतस्तरांच्या गुंतागुंतीची यामुळे संगती लावता येते असे दिसून येईल. आणि अशी संगती प्रस्तुत कादंबरीच्या आस्वादास नक्कीच उपकारक ठरेल असा विश्वास वाटतो.

(१४, स्वयंसिद्धा सोसायटी, पौड रस्ता, पुणे - ३८.)



अनुक्रमणिका







डॉ. पंडित आवळीकर-डॉ. विजया तेलंग

# उद्योगपर्व : एक 'देशीकार लेणे'

कुमारव्यास हा ज्ञानदेवांच्या जातीचा काव्यसृष्टीतील एक चमत्कार आहे. ज्ञानदेवांनी गीतेवर तर कुमारव्यासांनी महाभारतावर 'देशीकार लेणें' चढवले. खरे म्हणजे 'जडवले'. 'देशी' या शब्दाचा एक अर्थ सौंदर्य, लावण्य असा आहे. या दोघांनी त्याही अर्थाने 'देशियेचें' लावण्य दृग्गोचर आणि श्रुतिगोचर केले. संस्कृत व्यास अनुसरला : पण देशीचा हव्यास धरला, आपला प्रत्येक श्वास अजरामर प्रास बनवला.

कुमारव्यास आणि ज्ञानदेव यांचा 'देश' आणि त्यांची 'देशी' आजच्या कर्नाटक-महाराष्ट्र आणि कन्नड -मराठी यांसारखी विभक्त नाही, विलग नाही. स्थल आणि काल यांचा विलक्षण सलगपणा त्यांना लाभला आहे आणि रूपकात्मक चिंतन (Metaphorical thinking) या त्यांच्या 'धर्मा' मुळे त्यांच्या काव्याचे 'देशी' पणही अधिक वाढले आहे. हे दोघे समानधर्मे आहेतच : समकालीनही असावेत. कुमारव्यासांच्या कालनिर्णयाचा लंबक तेरावे ते पंधरावे शतक असा हेलकावत असला [१] तरी गोविंद पै [२] यांचा 'कुमारव्यासन कालविचार' आता निर्णायक ठरावा. 'मराटि' भाषेतील म्हणून त्यांनी दिलेले कुमारव्यास-भारतातील पैक, पारूखाणे, वीरपण, जाणपण, शौर्यपण, चंटुळपण, सामर्थ्यपण, विस्तारपण, हळुहळु, खेपेयिं हे शब्द स्थल-काल- भाषांच्या संदर्भात फार महत्त्वाचे आहेत.

*रावुतो मझ भापु रावुतु ।*
*देवु रावुतु भलरे रावुतु ।*
*रावुतो निश्यंक रावुतु रावुतेंदेनुत ।*
*रावु रावुतु पूतु रावुतु ।*
*भापु रावुतु रावुतो एं ।*
*दोवि होयिदाडिदरु रणदलि लाळ रावुतरु.* [३]

ही षट्पदी थोड्याफार फरकाने देऊन पै यांनी म्हटले आहे. "अच्च मराटि

---

१. सुमारे स-१४००: रं. श्री. मुगळी, कन्नड साहित्यचरित्रे, पुट २२६-३७.
१५ व्या शतकाचा मध्य : वि. सी. कुमारव्यास INB प्रकाशन, बेंगळूरू, पुट १४७-४८.
२. कुमारव्यासप्रशस्ति, कन्नड साहित्य परिषत्तु. बेंगळूरू, १९७८,
३. कुमारव्यास महाकविय कर्णाट भारत कथामंजरि, भीष्मपर्व, ४-६८.

विभक्तीरूपगळुळ्ळ शब्दगळिरूव इर्दोंदु इडी षट्पदियू इदे." [४] (शुद्ध मराठी विभक्तिरूपे आणि शब्द असलेली ही संपूर्ण षट्पदी आहे.) याखेरीज पैनी होयसळ (२) वीर नरसिंहाच्या काळातील दावणगेरे शिलालेखातील (स. १२२३-२४) 'मराटि प्रत्यय असलेले' एक कन्नड 'वृत्त' दिले आहे:

*"जवरातू जगदेकवीरू मझ देवा रोहकू बापु जा*
*दव नारायण नारसिंगु भल . . . ।"* [५]

सुमारे ३२-३३ वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या सोरटूरच्या युद्धात होयसळ सेनेने सेऊण सेनेला पिटाळून लावले, तेव्हा पळपुट्यांच्या तोंडचे हे वाक्य आहे.

हाच संदर्भ शं. बा. जोशींनी काहीशा विस्ताराने दिला आहे : 'हरिहर येथे आढळणाऱ्या एका शिलालेखातील एक वाक्य उद्बोधक आहे. सेऊणांचे आणि होयसळांचे युद्ध जुंपते आणि त्यात सेऊण यादवराजा हरतो असे वर्णन आहे. होयसळ नरसिंह हा स्वतःस 'यादव नारायण' आणि 'जगदेकवीर' म्हणवीत असे. हे बिरुद पळून जाणाऱ्या सेऊण सैनिकांच्या तोंडी घालून आपल्या पराक्रमाचे वर्णन करवून घेतलेले आढळते. "जवराव तू, जगदेक वीरू मझ देवा, रोहकु, बापु यादव नारायणु नारसिंगु भले' अशा आरोळ्या देत, नरसिंहाच्या पराक्रमाला माना डोलावीत, ते पळाले. अशा आशयाचे हे वाक्य आहे." [६]

हे वाक्य आणि कुमारव्यासांच्या 'भीष्मपर्वा' तील 'रावुतो मझ भापु रावुतु' ही षट्पदी यांवरून सेऊण/होयसळ यादवांच्या राजवटीशी निगडित असणारा कुमारव्यासांचा परिसर 'देशी'ने भारलेला होता. या मराठी रूपांविषयी पै लिहितातः 'ई मराटि रूपगळु आतन कालदल्लि हागू आतन नेरेयल्लि आडल्पडुतिद्द मराटियल्लि सर्वसामान्यवागि सलुवळियल्लिर वाडिकेयल्लि इद्दवागिरबेकेंबल्लि संशयविल्ल. ईग मेलण शासनद तेदि क्रि. श. १२२३-२४, ज्ञानेश्वरियदु क्रि. श. १२९० एंबुदरिंद कुमारव्यासनु इवक्के सरिगालदल्लि, अंदरे क्रि. श. १३०० क्के मुंचेये इद्दिरवेकु; अथवा बहळ हेच्चादरे क्रि. श. १३५० रोळगे आगि होगिरबेकु' [७] 'ही मराठी रूपे त्याच्या काळात आणि त्याच्या परिसरात बोलल्या जाणाऱ्या मराठीत सर्वसाधारण व्यवहारात रूढ असली पाहिजेत, याबद्दल संशय नाही. आता या वरील शिलालेखाचा काळ ख्रि.श. १२२३-२४. ज्ञानेश्वरीचा ख्रि. श. १२९० असल्याने कुमारव्यास, यांना समकालीन म्हणजे ख्रि. श. १३०० पूर्वी असला पाहिजे,

---

४. पूर्वोक्त, कुमारव्यासप्रशस्ति, पृ. ७-८.

५. तत्रैव, पृ. ८.

६. मऱ्हाटी संस्कृती : काही समस्या. पृ. ९१. 'हरिहर' ऐवजी 'दावणगेरे पाहिजे. पृ. ७४ वरही असाच उल्लेख आहे.

७. पूर्वोक्त, कुमारव्यासप्रशस्ति, पृ. ९-१०.










अथवा फार तर ख्रि. श. १३५० च्या आत होऊन गेला असला पाहिजे.)

गदगच्या जवळ असलेल्या कोळीवाड या खेड्यात 'नारणप्पा' (नारायण) नावाने ओळखला जाणारा हा कवी गदगच्या वीर नारायणाला कवी मानतो आणि आपणाला 'लिपिकार' म्हणवितो. कुमारव्यासांनी वीरनारायणाच्या मंदिरात– जेथे त्यांच्या नावाचा 'खांब' आजही आहे– आपले 'महाभारत' लिहिले. याही बाबतीत ज्ञानदेव आणि त्यांचा 'पैसाचा खांब' यांचे येथे स्मरण होते.

*अररे धणु भापु भळिरे ।*
*धिरूरे मझ पूतुरे पायकु चागु सले सुं. ।*
*पुरेयेने कोंडाटद नुडि ।*
*तुरुगळेनल्का कळेंदु तिळिगे विदग्धर*[८] *॥४६ ॥*

या पद्यातील बहुतेक शब्द 'कोंडाटद नुडि'/खेळांतील शब्द किंवा उद्गार म्हणून कृष्ण जोइस यांनी दिलेले आहेत. परंतु ही नियमित षट्पदी नाही. त्यमुळे तिचे कर्तृत्व कुमारव्यासांकडे देणे शक्य होत नाही. निदान ही रचना शंकास्पद तरी वाटते. मात्र हे कदाचित घोड्यांशी संबंधित उद्‌गार म्हणून खेळात आणि युद्धात त्या काळी रूढ असावेत.

कुमारव्यासांच्या 'पूत मझ सागरन बिगुहु' या पट्‌पदीबाबत (१-२०) मात्र कसलीही शंका नाही.

### कुमारव्यास आणि मुनिव्यास

कुमारव्यास आणि 'स्थानपोथी' कार महानुभाव ग्रंथकार मुनिव्यास हे एक असावेत, असे शांताराम जहागीरदार यांनी प्रतिपादिले आहे. 'कुमारव्यास हागु कुमारवाल्मीकि कविगळ काल मत्तु मतगळ विचार'[९] या निबंधाबरोबरच 'कुमारव्यास कविय हेसरू हागू स्थळगळ विवेचने'[१०] मध्ये त्यांचा हा तर्क व्यक्त झाला आहे.

'कुमारव्यासांनी मराठी भाषेत काहीतरी लिहिले असावे'; 'त्याच्या कृतीत महानुभाव पंथाची तत्त्वे आहेत'; 'महानुभाव पंथीय श्रीकृष्णाला 'दत्तात्रेय' म्हणून पूजतात. कुमारव्यास त्या पंथाच्या दत्तात्रेयाची अशी स्तुती करतात :

*राय कळे विमलदत्ता ।*
*त्रेयवेसरलि धर्मवनु पू ।*
*रायदलि पल्लविसिदनु हैहेयन राज्यदलि ।*
*बायिबडिकरू बगुळिदरे हरि ।*

---

८. उद्योगपर्व, (सं) कृष्ण जोइस, परिशिष्ट २, भारत निघंटु, पृ. २३६.

९. साधने, पुट १३३-६८.

१०. बेळुवल (सं) ज्योति होसूर (इ.), कालगति प्रकाशन, रायबाग, फेब्रुवारी १९८२, पृ. ३३८-३९.

*यायतिके पासटिये निगमद ।*
*बाय बियगवि मुकुंदन नरिवरारेंद ।"*

भागवत पंथात कृष्णभक्ती आणि द्वैत ही महानुभाव पंथाची तत्त्वे आहेत असे मान्य केले, तर कुमारव्यासांच्या कृतीत ती आहेत हेही मान्य करता येईल. जहागीरदारांनी कुमारव्यासांनी केलेली जी दत्तात्रेय स्तुती उद्‌धृत केली आहे, तिच्यात 'त्या पंथाच्या' ('आ पंथद') दत्तात्रेयाच्या खास खुणा काही दिसत नाहीत. त्यांचा एक तर्क उरला तो कुमारव्यासांच्या मराठीतील 'काहीतरी' लिहिण्याबाबतचा. या तर्काला प्रत्यक्षात एखाद्या ग्रंथाचा आधार नाही. 'मुनिव्यासकुमार" एं बोब्ब व्यक्ति इद्दु 'स्थानपोति' एंब ग्रंथवन्नु बरेदिद्दाने' [११]. (मुनिव्यासकुमार नावाच्या व्यक्तीने 'स्थानपोथी' नामक ग्रंथ लिहिला आहे) हे खरे असले, तरी हाच तो कुमारव्यासांचा मराठी ग्रंथ असे म्हणता येणार नाही. कारण कुमारव्यास आणि मुनिव्यास यांचे अभिन्नत्व जहागीरदारांना सिद्ध करता आलेले नाही, ते सिद्ध करता येण्यासारखे नाही. 'मुनिव्यास' असे 'स्थानपोथी' काराचे नाव आहे. 'मुनिव्यासकुमार' असे नाही. तसे मानून त्याला 'कुमारव्यास' बनवणे योग्य होणार नाही. तो 'कुमार' आम्नायातील आहे. शं. गो. तुळपुळे लिहितात : 'या शतकाच्या अखेरीस ऐतिहासिक व भौगोलिकदृष्ट्या महत्त्वाचा असा एक ग्रंथ निर्माण झाला व तो म्हणजे 'स्थानपोथी' हा होय. हा ग्रंथ म्हणजे महानुभाव पंथास पूज्य अशा चक्रधरस्पृष्ट तीर्थस्थानांची एक तपशीलवार नोंद असून त्याची रचना कुमरे आम्नायातील मुनिव्यास (पूर्वाश्रमीचे पंडित कमलाकर अयाचित) यांनी शके १२७५ च्या सुमारास केली.' [१२]

जहागीरदार म्हणतात त्याप्रमाणे 'अम्नाय एंदरें गुरुपरंपरे.' परंतु 'आ परंपरे येंदरे व्यासपरंपरे'-(ती परंपरा म्हणजे व्यासपरंपरा) महाभारतकार व्यासांची परंपरा, असे मात्र नव्हे. कुमारव्यासांनी 'पीठिके' मध्ये, 'स्वतःला मगनेंदु' (पुत्र म्हणून) वेदव्यासांनी पत्करल्याचे सांगितले आहे. म्हणून ते 'व्यासकुमार,' अर्थात 'मुनिव्यासकुमार' आणि 'कुमारव्यास' ही एकव्यक्तित्व सुचवणारी पदे आहेत. शब्द जोडताना उलटीपालटी झालेली दोन रूपे आहेत [१३] हे जहागीरदारांचे म्हणणे म्हणूनच तर्कदुष्ट वाटते. 'स्थानपोथी चे स्वरूप,' त्याच्या कर्त्याविषयीची निःसंदिग्ध माहिती यांवरून मुनिव्यास आणि कुमारव्यास यांचा काही एक संबंध नाही एवढेच सिद्ध होते. तर्कच करावयाचा असेल तर 'ऋद्धिपूर' वर्णन ही

---

११. बेळुवल, पृ. ३४०.

१२ महाराष्ट्र सारस्वत, पृ. ७४९.

१३. "कवि तन्नन्नु व्यासर मगनेंदु हेळिकोंडिरुवुदरिंद आत 'मुनिव्यासकुमार" अर्थात 'मुनिव्यासकुमार' मतु 'कुमारव्यास' इवु एकव्यक्तियन्नु सुचिसुव पदगळु, शब्दगळ होंदाणिकेयल्लि पल्लटगोंडु आद एरडु रूपगळु."

कुमारव्यासांची मराठी कृती असून ते आणि त्या ग्रंथाशी नाव जोडले गेलेले नारायण व्यास किंवा नारोबास (बहाळिये) हे एकच होत असाही करता येईल. निदान कुमारव्यासांचे मूळ 'नारायण' (नारणप्प) हे नाव आणि 'व्यास' हे पद यांची सांगड बसेल. असे तर्क रिकामपणची कामगिरी म्हणून मिष्ट असले, तरी इष्ट मात्र नाहीत.

**कुमारव्यासांची भारतातील भर**

कुमारव्यासांनी महाभारतात स्वतःची म्हणून जी मौलिक भर घातली, तिच्यात भरसभेत दुर्योधन, कृष्णाच्या पदांगुष्टाच्या धक्क्याने, सिंहासनावरून पडला तो हरिचरणांवर, या प्रसंगाचा समावेश आहे. राजसभेत प्रवेश करताच कृष्णाला सर्वांनी उत्थापन दिले. पण 'कुमति' दुर्योधन सिंहासनावरून उठला नाही हे सांगून कुमारव्यास जणू एका चमत्काराचे वर्णन करतात :

*सेणसु सेरद देवनिदिरलि ।*
*मणियदातन काणुतवे धा ।*
*रुणियनोत्तिदनंगुटद तुदियिंद नसुनगुत ।*
*मणिखचित कांचनद पीठद ।*
*गोणसु मुरिदुदु मेले सुर सं ।*
*दणिगळा एने कविदु बिद्दनु हरिय चरणदलि ॥*
*धरणिपति सिंहासन मे ।*
*लिरदे बहरे नावु बंदे ।*
*हरसुवेवु तप्पावुदेनुदेत्तिदनु मस्तकव ।*
*सुरनदिसुत कैगुडलु के ।*
*सरिय पीठके देव बंदनु ।*
*कुरुकुलाग्रणिगळ सुसन्मानवानु कैकोळुत.*[१४]

दुर्योधनाला उद्धटपणाबद्दल झालेले हे सहजशासन म्हणजे परस्परविरुद्ध रंगांत रेखाटलेले एक सुरेख 'रंग' चित्र आहे.

चंद्रात्मज रूद्राने मराठीत उतरवलेले या चित्राचे प्रतिरूपही तितकेच देखणे आहे. (८-१२८-३२).

कुमारव्यासांच्या प्रतिभेने निर्माण केलेल्या या कृष्णलीलेला पुढे पुरंदरदासांनी 'अपमानवादरे वळितु' या आपल्या गोड पदात अजरामर करून ठेवले आहे.

दुर्योधनाच्या गर्वहरणाचा हा प्रसंग कुमारव्यासांना कसा सुचला असावा ? यासंबंधी रं. श्री. मुगळी म्हणतात : "ई संनिवेशवन्नु भासन 'दूतवाक्य' नाटकदिंद तेगेदकिकोंडिर

---

१४. कर्णाट भारत कथामंजरि, उद्योगपर्व, ८-५९,६०

बहुर्देब सूचने माडलागिदे" [१५] (हा प्रसंग भासाच्या 'दूतवाक्य' नाटकातून घेतला असावा, असे सुचवले गेले आहे"). हे कोणी सुचवले याचा येथे निर्देश नसला, तरी एस. एन. कृष्ण जोइस यांनी कुमारव्यासांच्या 'उद्योगपर्वा'ला जोडलेल्या आपल्या 'पीठिके'त या प्रसंगाच्या मूलस्रोताबद्दल विवेचन केले आहे. ते सांगतात : "दुर्योधननु आसनदिंद उरुळि बीळुव संन्निवेश व्यास भारतदल्लिल्ल. भासन दूतवाक्यदल्लू आसनदिंद बिद्दनेंदिदेयेविना कृष्णनकालुगळ मेले बिद्दनेंदिल्ल" [१६]. (दुर्योधन आसनावरून गडगडत पडण्याचा प्रसंग व्यासभारतात नाही. भासाच्या दूतवाक्यातही आसनावरून पडला असे असले तरी कृष्णाच्या पायांवर पडला असे नाही.)

मूळ महाभारतात 'भगवद्यानपर्वा'त श्रीकृष्णाचा सभाप्रवेश हा ९४ वा अध्याय आहे. दुर्योधन कृष्णाला न्यावयाला आला आणि दुसऱ्या एका स्वतंत्र रथात बसून त्याच्या मागे चालला, असा तेथे कथाभाग आहे.

कुमारव्यास महाभारताची पुनर्निर्मिती करतात, पुनरावृत्ती नव्हे. विदुराने दुर्योधनाला 'अजपुत्र' म्हणणे, कौरवांशी 'संधी' करण्याबाबत कृष्णाने द्रौपदीचाही अभिप्राय विचारणे, गांधारी आणि भानुमती यांनी विश्वरूपदर्शन झाल्यावर कृष्णाची प्रार्थना करणे आणि संधी मोडल्यावर कृष्णाने सात्यकीबरोबर धर्मराजाला पाठवलेला निरोप व धर्मराजाने केलेले कृष्णाचे स्वागत ही 'नव' निर्मिती आहे.

### चंद्रात्मज रूद्र : काळ, कुळ आणि कुलदेव

चंद्रात्मज रूद्र हा कवी आणि त्याचे काव्य याविषयी झालेल्या पूर्वसंशोधनात शं. श्री. देव यांचे 'चंद्रात्मज कवी' हे टिपण [१७] फार महत्त्वाचे आहे. त्यांनीच या कवीचा आणि त्याच्या 'उद्योगपर्वा'चा प्रथम परिचय करून दिला.

देवांनी 'उद्योगपर्वा'च्या आधारे कवीची गुरुपरंपरा दिली आणि त्याचा श. १६५० च्या आसपास काळ मानला. चंद्रात्मज रूद्राने केलेल्या ग्रंथसमाप्तिकालासंबंधीच्या उल्लेखाविषयी ते लिहितात : 'यात शकाचे नाव असते तरी शक ठरविता आला असता." 'शकाचे' ऐवजी त्यांच्या मनात 'सवंत्सराचे' असे लिहावयाचे असावे. कारण 'शालिवाहन' हे शकनाम गृहितच आहे.

चंद्रात्मज रूद्राने ग्रंथाच्या अखेरीस ग्रंथसमाप्तिनिदर्शक ओवीत संवत्सराचा उल्लेख केला नाही हे खरे आहे काय? स्पष्ट उल्लेख नाही : पण 'श्लिष्ट' उल्लेख आहे. देवांप्रमाणेच गो. का. चांदोरकर आणि ज. र. आजगावकर यांच्या दृष्टीतून तो सुटला आहे.

---

१५. कन्नड साहित्यचरित्रे पृ. १४६

१६. उद्योगपर्व, (सं) कृष्ण जोइस, पृ. IXXVII टीप

१७ षाण्मासिक इतिवृत्त शके १८३४ पृ. १६८-६९ भारत इतिहास संशोधन मंडळ, पुणे.



अनुक्रमणिका






तीस वर्षांपूर्वी 'चंद्रात्मज रूद्र' हा शोधनिबंध लिहिताना पंडित आवळीकर [१८] यांच्याही नजरेतून ही ओवी निसटली :

*जयाचा पिता आनकदुंदुभी । म्हणोनि गर्जे वेददुंदुभी ।*
*त्याचा कृपानुग्रह ग्रंथारंभी । होता आरंभी कवित्व ॥१२-१३४॥*

ही ओवी ग्रंथसमाप्तिकालद्योतक असून देवांनी तिच्यापुढील ओव्या दिल्ल्या, पण ही दिली नाही. अन्यत्र त्यांनी कवीच्या पित्याचे नाव 'दुंदुभी' नसून 'चंद्र' असल्याचे मत देताना या ओवीचा आधार घेतला. चांदोरकरांनी या ओवीचा चुकीचा अर्थ लावून म्हटले : "(चंद्रात्मज रुद्र) यांनी 'उद्योगपर्वा' त आपल्या पित्याचे नाव 'दुंदुभी' दिले आहे." [१९]

चांदोरकरांचा हा गैरसमज असला आणि देवांनी लावलेला "आनकदुंदुभि म्हणजे वासुदेव व वासुदेव ज्याचा पिता त्या कृष्णाची कृपा झाल्याने ग्रंथारंभ करता आला" [२०] हा अर्थही बरोबर असला, तरी 'दुंदुभी' हे श्लेषाचे सुंदर उदाहरण अमन चंद्रात्मज रुद्राने 'दुंदुभी' नाम संवत्सर येथे सूचित-नव्हे, स्पष्टच सांगितले आहे. शके १६६४ मध्य 'दुंदुभी' संवत्सर होते. शक तिथी, वार आणि आता संवत्सर यांचा मेळ बसतो. कार्तिक शुद्ध प्रतिपदा, सोमवार, श. १६६४ म्हणजे स. १८ ऑक्टोबर १७४२ या दिवशी हे 'उद्यागपर्व' समाप्त झाले. [२१] उपर्युक्त ओवीत 'त्याचा' म्हणजे 'कृष्णाचा' तसेच 'दुंदुभी'चा.

देवांनी दिलेला पोथीचा लेखनशक बरोबर आहे. त्यांनी न दिलेला पण पोथीत दिला गेलेला वार 'सोम्य' असा आहे. प्रत्यक्षात तो 'बुधवार' आहे आणि पोथी लिहिल्याची तारीख २३ ऑक्टोबर १७६५ 'अशी ठरते. [२२] 'उद्यागपर्वा'ची कालनिश्चिती ही पूर्वसंशोधनातील नवी भर होय.

देव-आजगावकरांच्या विवेचनात 'नमना'तील 'जनपंडित' हे नाव उल्लेखिलेले नाही. 'जनपंडीत महाज्ञानी' (१-२६) हा निर्देश कुणाचा? एकनाथांपूर्वी आलेले हे नाव एकनाथांचे गुरू 'जनार्दन' स्वामी यांच्यासाठी आलेले असावे असे वाटते.

जनपंडित नावाचा एक कवी सतराव्या/अठराव्या शतकात होऊन गेला आणि त्याने 'लीला-भागवत' नावाचा ग्रंथ लिहिला असला तरी तो उत्तरकालीन आहे, म्हणून हा निर्देश त्या कवीचा नव्हे. अ.ना.देशपांडे यांनी [२३] एकाच खंडात या कवीला एकाच वेळी, अनुक्रमे

---

१८. नवभारत, जून १९६०: जुने वाङ्मयः नवे संशोधन, पृ. १८४-१९९.

१९. संतकविकाव्यसूची, पृ. ३५.

२०. श्री रामदासी संशोधन, खं. २, पृ. २६९-७०.

२१. बाळाजी प्रभाकर मोडक, शक व सन यांची तिथी व तारीखवार जंत्री, पुणे-कोल्हापूर, १८८९, पृ. ३७.

२२.तत्रैव, पृ.९४

२३. मराठी वाङ्मयकोश, प्राचीन खंड, पृ. ५३ आणि ४०७.

'अठराव्या' आणि '१७ व्या' शतकात वावरण्याइतके दीर्घायुष्य दिले आहे. 'जन' हे उपलब्ध ओवीतील नाव मुळात 'जना' असे असावे.

चंद्र हे कवीच्या पित्याचे नाव होते हे निर्विवाद असले, तरी त्याचा ठावठिकाणा पूर्वसंशोधकांना लागला नव्हता. आवळीकरांनी मुडलगीच्या स्वामींवरील आपल्या संशोधनात प्रथमच त्याचे 'कुळ' आणि संभाव्य 'स्थळ' सांगण्याचा प्रत्यत्न केला.

मुडलगीच्या स्वामींचे चरित्र असलेल्या 'देशिकचरित्रा'तील पुढील ओवी आवळीकरांनी [२४] प्रकाशात आणली :

> *शिवबोधाचा चुलतबंधू । चंद्रात्मज रुद्र मुनी प्रसिद्धु ।*
> *ज्यांची लीला अगाधु । श्रवण विवेकसिंधु निरंतर ॥१-२० ॥*

मुडलगीच्या स्वामींपैकी दुसऱ्या शिवबोधांचा चंद्रात्मज रुद्र हा चुलत भाऊ होता : तो 'मुनि' म्हणून प्रसिद्ध होता : 'रूद्र' हे त्याचे व्यक्तिनाम होते : त्याची लीला ('चमत्कार'शक्ती) अगाध होती : आणि मुकुंदराजांचा 'विवेकसिंधू' त्याच्या श्रवणात निरंतर होता; ही पूर्णतया नवीन माहिती कविचरित्राच्या दृष्टीने मोलाची आहे.

'देशिकचरित्रा'त सांगितल्याप्रमाणे होसुरास मल्लिकार्जुन कुळकर्ण्यांकडे 'भीमातीराहुनी' कोणी आप्त आले होते. संगमनाथ (म्हणजेच दुसरे रंगबोध) हा त्यांचा मुलगा. पहिले शिवबोध त्या वेळी तेथे गेलेले होते. त्यांनी संगमनाथास त्याच्या आईवडिलांकडून मागून घेतले. आणि त्याच्या आईस 'अष्टपुत्रा सौभाग्यवती भव' असा आशीर्वाद दिला आणि तो अक्षरशःच नव्हे, तर अंकशःदेखील खरा झाला, असे आख्यायिका सांगते. संगमनाथांच्या मूळ घराण्याचा 'वंश' असा दाखविता येईल :

(१)




'चंद्र', 'रुद्र' ही नावे त्या काळी प्रचारात होती. चंद्रोपंत, रुद्रोपंत ही तर व्यवहारात होती. 'चंद्राजीपंत' हे नाव श्रीधर कवीच्या वंशावळीत आढळते. [२५] गोत्र : वसिष्ठ, कुलदेव : संगमेश्वर; मुडलगीशी नात्याने संबंधित; असे हे 'कुळ' कुळकर्ण्यांचेही असू शकेल. कवीचे स्थळ 'भीमातीरावर' हेही नक्कीच. पण कोणते ? 'कृष्णामलापहारीचा संगम' म्हणजे

---

२४ देशिकचरित्र, नवभारत, सप्टेंबर १९५८ : जुने वाङ्मय : नवे संशोधन, पृ. १८९.

२५. महाराष्ट्र सारस्वत, पृ. ४४०.

श्रीबसवेश्वरांची 'कूडलसंगम' होय. 'स्थान पवित्र उत्तमोत्तम' [२६] असा त्या स्थळाचा गौरव चंद्रात्मजाने केला आहे. परंतु त्याचा कुलदेव असलेला संगमेश्वर आणि त्याचे स्थान वेगळेच असले पाहिजे.

*तो कुलदेव संगमेश्वर। आदिगुरू परात्पर।*
*कपिलासंगमीं निरंतर। वास अनादि ज्यासी।*

या ओवीवरून आजगावकरांनी विधान केले : 'कृष्णा व मलप्रभा यांच्या संगमावर असलेला संगमेश्वर महादेव ही कवीची कुलदेवता होती.' [२७] स्थूलमानाने हे बरोबर आहे. पण काटेकोरपणाने अचूक नाही. 'हा संगमेश्वर म्हणजे श्री बसवेश्वरांचा 'कूडलसंगम' होय," [२८] हे आवळीकरांचे विधानही त्यांच्यासारखेच (म्हणजे आजगावकरांच्या विधानासारखे) 'स्थूल' आहे. आवळीकरांनी 'कृष्णामलापहारीचा' संगम' अशी शब्दयोजना करावयाला हवी होती. आता ती दुरुस्ती होत आहे. आजगावकरांनी उद्‌धृत केलेल्या दोन ओव्यांकडे सूक्ष्मपणे पाहिले गेले नाही. त्यांतील उपरिनिर्दिष्ट ओवीवरून हे स्पष्ट होते :(१) 'संगमेश्वर' हा त्याचा कुलदेव आहे. याचेच 'संगमनाथ' असे नाव कवीने आपल्या 'उद्योगपर्वा'त दिले आहे. (१-१७). (२) तो परात्पर आदिगुरू आहे. म्हणजे दत्तात्रय. 'संगमनाथ' हा 'सच्चिदानंद'रूपी आहे : दत्तरूपी आहे. (३) त्याचा 'अनादि'आणि 'निरंतर' वास 'कपिलासंगमी' आहे.

खरा प्रश्न आहे: मग हा संगमनाथ कोण आणि कुठला ?

### चंद्रात्मज रूद्राचे मुगळखोड

मुगळखोडहून संगमनाथ हे मुडलगीच्या स्वामी- घराण्यात आले असे ऐकले होते. मुगळखोड या नावाची बरीच गावे आहेत. एकाविषयी आवळीकरांनी लिहिले आहे : 'मुगळखोड : 'मुगकोंडीं पाषाणलिंग' भंगले होते ते कोनेरीबोधांनी अभंग केले, असे धुंडिराजेश्वर सांगतो (पद ५ वे) तेच हे गाव असावे. मुडलगीहून ८ मैलांवर" [२९] आणखी एक मुगळखोड मुधोळजवळ आहे. पण ही गावे भीमातीरावर नाहीत.

'गुरुचरित्रा'तील तीर्थवर्णनामध्ये पुढील ओवी आहे :

*कपिलऋषि विष्णुमूर्ती। प्रसन्न तयासी गायत्री।*
*श्वेतशृंगी प्रख्याती। उत्तरवाहिनी कृष्णा असे ॥१५-८४॥*

'कपिल' या पदाकडे 'कपिलासंगमा'च्या शोधार्थ लक्ष दिलेच पाहिजे. पण त्याहून

---

२६. उद्योगपर्व, १२-१७७.

२७. महाराष्ट्र -कवि-चरित्र, पृ. ३८.

२८. जुने वाङ्मय : नवे, संशोधन, पृ.१९०.

२९. मुडलगीचे स्वामी, पृ. १४६.

महत्त्वाचे पद आहे 'श्वेतशृंगी'. 'श्वेतशृंगी' हे स्थलनाम असून 'मुगुळकोडु' - मुगुळखोड - मुगळखोड हे या ग्रामनामाचे कन्नडीकरण आहे. 'मुगुळ हे संस्कृत 'मुकुल' (कळी) शब्दाचे रूढ रूप आहे. 'कोडु' या कन्नड शब्दाचा अर्थ 'A horn of animals' म्हणजे 'शृंग' तसेच 'the peak or top of a hill, a hill [३०] हा (डोंगर) शिखरा' चा अर्थच कोडु- शृंग, या भाषांतरात आहे, मुगळु-मुगुळ. 'A bud; that is shaped like a bud 'an opening bud', असे अर्थ किटेलने दिलेले आहेत. [३१]

'मुगळक्कि' म्हणजे 'Rice that is not properly boiled'. म्हणजे कळ्यांसारखा भात (ज्याला आपण चुरमुऱ्यासारखा फडफडीत भात असे अत्यंत गद्याळपणे म्हणतो). यासारखाच काव्यात्म प्रयोग म्हणजे 'मुगुळुगण्ण;-कण्ण'. म्हणजे 'An eye like an opening bud'. कालिदासाच्या 'दन्त मुकुलान्' चे येथे स्मरण होते. 'कुंद' कळी, 'मोगरी' ची कळी या प्रयोगांतून आकाराप्रमाणेच 'शुभ्र' वर्णही सुचवायचा असतो. त्यामुळे 'शुभ्र'पण 'मुगुळ' या पदातून व्यक्त झाले. म्हणून 'श्वेतशृंग'चे 'मुगुळकोडु' हे कन्नडीकरण मानण्यात अडचण नसावी. 'उमलत्या कळीसारखी टेकडी;' असा या ग्रामनामाचा अर्थ होईल. रायचूर जिल्ह्यात देवदुर्ग तालुक्यात कृष्णातीरावर 'कोप्पर' या नावाचे गाव आहे. ते 'कार्पर क्षेत्र' म्हणून प्रसिद्ध आहे. जवळच 'श्वेतशृंग' हे पवित्र स्थळ आहे. पांढऱ्या शुभ्र टेकडीवर (बिळे गुड्डु) केशवदेवाचे देऊळ आहे आणि पात्रातही 'श्वेतगिरी' म्हणावा असा उंच भाग आहे. हेच चंद्रात्मज रुद्राचे 'मुगळकोड' असावे. हे स्थळ 'भीमा' तीराहून, संगमाहून फार दूर नाही. पंचक्रोशीतच आहे. आणखी एक स्पष्टीकरण : 'श्वेतशृंग' या शब्दाचा वा. शि. आपटे [३२] यांनी 'barley' असा अर्थ सांगितला आहे. 'यव' : सातू. 'मुगळ (क्वी)' म्हणजे 'सातू' : barley असा अर्थ घेतल्यास आणि 'खोड' हे 'खेड' चे रूप मानल्यास (धुळखेड, मळखेड यांच्याप्रमाणे) 'शालि'ग्राम, 'साळ' गाव याप्रमाणे ते धान्यवाचक ठरेल.

'मुगळखोड' हे चंद्रात्मज रुद्राचे गाव नेमके कोठे आहे हे सांगताना गुलबर्गा जिल्ह्यातील यादगीर तालुक्यातील 'संगम' हे स्थान विचारात घेतले पाहिजे. या स्थळाची अधिकृत माहिती अशी :

"Sangam in Yadgir Taluk is a holy place where the Bhima river joins the Krishna. It is also called Naragadde. Throughout the year,

---

३० A Kannada Engilsh Dictionary P. 497.

३१. A Kannada-English Dictionary, P. P. 1258-59.

३२. Sanskrit-English Dictionary, P. 568.

*'बार्ली' हे धान्य दिसताना उमलत्या कळीसारखे दिसते, त्यामुळे राळे (नवनक्कि), वरी (वरदक्कि) याप्रमाणे 'बार्ली' हा 'मुगळक्कि' या नावाने तांदळाचा प्रकार मानला जाणे संभवनीय आहे आणि Barley हा आपटे यांनी दिलेला 'श्वेतशृंग' चा अर्थ स्वीकारता येईल.

Hindus from all parts of the country visit the place and take the holy bath at the confluence. The Chennveera Basaveshwara Fair is held here about the month of Februarcy every year. Sangam is very near the Krishna railway station between Raichur and Yadgir on the Madras Bombay broadgauge route" [३३]

'काडलूर' येथील, 'कृष्णा' रेल्वेस्टेशनजवळचा 'संगम' हाच कपिल (ला) संगम होय : तेथील 'संगमनाथ' 'संगमेश्वर' हाच सच्चिदानंदरूपी 'दत्तात्रय' स्वरूपी असा चंद्रात्मज रुद्राचा कुलदेव होय. 'संगम' च्या आसपासचा पंधराएक मैलांचा सबंध परिसर 'दत्त'मय आहे. 'कुरवपूर' हे विख्यात दत्तक्षेत्र येथेच आहे. श्री. श्री. देशपांडे [३४] लिहितात : 'कृष्णा नदीत भीमा गुप्त झाली तो प्रयाग (संगम) कृष्णा स्टेशनजवळ आहे. तेथून पुढे भीमा नदीस पोटात घेऊन कृष्णाच वाहू लागली. येथून नदीचे पात्र रुंदावत चालले. कृष्णा स्टेशनपासून सुमारे सोळा मैलांवर कासवाच्या आकाराचा एक मोठा भूपृष्ठभाग आहे. यासच कुरवपूर (मराठी), कुरुगड्डी (कानडी), कुरमगड्डा (तेलगु), करवाकला (उर्दू) असे म्हणतात. याच्या चोहोबाजूने पाणी आहे. याच्या आसपास आणखीही नारगड्डा, रामगड्डा, पुल्लमगड्डा, बल्लीगड्डा, बारगड्डा चित्तलगड्डा अशी कूर्मवत छोटी बेटे आहेत. या सर्वांत कुरुगड्डी एक मोठा गड्डा आहे." 'गड्डे' या कन्नड शब्दाचा अर्थ 'बेट' असा आहे.

'संगम' लाच 'नारगड्डे' असेही म्हणतात, हे जसे गुलबर्गा जिल्ह्याच्या गॅझेटियरमधून स्पष्ट होते तसेच या स्थळाचे 'Anur (B)' हे लोकसंख्या अहवालातील [३५] नावही उघड होते. 'कूर्मगड्डे'बद्दलची ही अधिकची माहितीही महत्त्वाची आहे : "Just near Naradagadde there is Koormagadde (Kurma kshetra or Kuravakala) which has a Dattatraya Peetha and the Samadhi of Shripadvallabha Swami. It is said to be the original place of Dattatraya. It has a temple dedicated to him which is visted by devotees from far and near" [३६]

कूर्मगड्डे हे ठिकाण रायचूर तालुक्यातील आहे. जिल्हा रायचूर.

---

३३. Mysore State Gazetteer, Gulbarga, District (Ed) B. N. Shri. Sathyan, Bangalore, 1966, P. 469.

३४. सिद्धभूमी कुरवपूर, श्रीक्षेत्र कुरुगड्डी, श्रीपाद प्रकाशन, पुणे, शके १८९१, पृ. ४६.

३५. Census of India 1971, Series 14, District Census Handbook, Gulbarga District, P. 150.

३६. Mysore State Gazetteer, Raichur District, (Ed) K. Abhishankar, Bangalore, 1970, P. 705.











या स्थळांचे 'गुरुचरित्रा' तील काही संदर्भ पाहण्यासारखे आहेत. श्रीपादश्रीवल्लभांचे तीर्थाटन सांगताना आठव्या अध्यायात श्रीगिरि (म्हणजे श्रीशैल) (४); निवृत्तिसंगम (७) अशी यात्रा करून ते कुरवपुराला आले असे उल्लेख आहेत.

*महाक्षेत्र कुरवपूर । कृष्णागंगा वाहे नीर (८)*

या चरणात 'कृष्णागंगा' का म्हटले आहे ? श्री. श्री. देशपांडे म्हणतात : 'श्रीक्षेत्र कुरवपूर हे महाक्षेत्र कृष्णा-गंगा संगमाजवळ वसले आहे. बारा ज्योतिर्लिंगांपैकी, भीमाशंकर नावाचे महाराष्ट्रात एक ज्योतिर्लिंग आहे. तेथून शंकराच्या जटेतून निर्माण झालेली गंगा तिलाच भीमा असे म्हणतात. तीच भीमा पंढरपुराजवळ आली, तेव्हा तिला चंद्रभागा म्हणू लागले. पुढे हीच भीमा चंद्रभागा 'तुझ्या चरणीच्या गंगा' म्हणून नामाभिधान पावली. ही गंगा गाणगापुरास अमरजा नदीला घेऊन्न कृष्णा स्टेशनजवळ कृष्णेस मिळाली, म्हणून कृष्णा व गंगा असे म्हटले.[३७]

पुढे नवव्या अध्यायात राजा झालेला रजक भेटीस आला ते वर्णन करणाऱ्या ओव्या कुरवपूरचा आणि एकूणच संबंधित परिसराचा भूगोल डोळ्यांपुढे उभ्या करतात :

*स्त्रियासहित आपण । अलंकृत आभरण ।*
*क्रीडा करीत स्त्रिया आपण ।* **गंगेमधून येतसे** *॥ १६ ॥*
*सर्वदळ येत* **दोनी थडी** *।.......... ॥ १७ ॥*
**ऐसा गंगेच्या** *प्रवाहांत । राजा आला खेळत ।*
*अनेक वाद्यनाद असे गर्जत ।* **कृष्णावेणी थडीयेसी** *॥ १८ ॥*

(१६) आणि (१८) मध्ये 'गंगा' म्हणजे 'भीमा'. 'वेणी' चे अनेक अर्थ आहेत. शंकराच्या जटेतून निघालेली त्याची वेणी म्हणून 'भीमा' असा अर्थ घेतल्यास राजा भीमेतून, पुढे कृष्णा-भीमा यांच्या संगमाच्या 'दोनी थडी'/ 'थडीयेसी' आला. असे मानता येईल. 'वेणी' चा आणखी एक अर्थ 'संगम' असाही आहे : '४ The Confluence of two or more rivers'[३८]

*भीमाकृष्णासंगमेंसी । स्नान करितां परियेसी ॥*
*सात जन्म विप्रवंशी । उपजे नर परियेसा ॥ १५-६५ ॥*

असे 'संगमा' चे महत्त्व सरस्वतीगंगाधर सांगतो. ( या आधीच्या ओवीत त्याने मलप्रभाकृष्णासंगमाचे महत्त्व वर्णिले आहे. त्यावरून दत्तसंप्रदायात 'कूडलसंगम' ही लक्षणीय क्षेत्र आहे आणि म्हणूनही चंद्रात्मज रुद्राने 'संगम' आणि 'कूडलसंगम' एका पाठोपाठ निर्देशिले असावेत.)

या ठिकाणी अधिक शोधाचा एक विषय नोंदून ठेवतो. विशेषतः 'कुंडलसंगम' च्या

---

३७. सिद्धभूमी कुरवपूर, पृ. ३०.
३८. Sanskrit-English Dictionary, P. 532.

संदर्भात, आणि एकूणच 'वचनां' त दत्त, दत्तात्रेय आणि दत्तोपासना यांचे उल्लेख आढळत नाहीत. बसवण्णांच्या वचनांत अन्य दैवतांचे, त्यांच्या उपासनेचे निर्देश येतात. पण शिवस्वरूपी दत्ताचा का येऊ नये? असाच प्रश्न शिरी देवराणा वाहणारा विठ्ठल आणि त्याची उपासना यांबद्दल निर्माण होतो.

कुलदेव संगमेश्वर असल्याने चंद्रात्मज रुद्राला 'संगम' प्रिय आहे. त्यामुळे त्याची संगमप्रीती त्याच्या काव्यात कशी सहजासहजी प्रकट होते हे पाहण्यासारखे आहे. 'चिंतोदधि' (१०-१२) या कुमारव्यासांच्या रूपकाचा अनुवाद करताना चंद्रात्मज म्हणतो :

कौरव पांडव दुथडिसम। मध्य चिंतेचा जळसंगम ॥ ११-२९ ॥ याहून काव्यात्मही ठरणारे, एक स्वतंत्रच रूपक चंद्रात्मज उपयोजितो ते सभेतील 'कोमलांगियरू' (८-४४) कशा होत्या हे सांगताना :

*दोहीं स्तनाचे मध्यम। मुक्ताहार नदी परम।*
*दुथडीसी चक्रवाकोपम। कुच उद्दाम शोभती ॥ ८-९३ ॥*

चंद्रात्मज हा असा 'दुआब' प्रदेशातील आहे. त्याचे मुगळखोड हे गाव आणि संगमेश्वर हे कुलदैवत यांचा हा परिसर आहे. यादगीरपासून २५ मैलांवरील 'डिग्गी' येथे 'संगमनाथ' देवाचे मंदिर असून येथे श्रावणात जत्रा भरते.[३९]

### चंद्रात्मजाची 'गुरु' परंपरा

चंद्रात्मज रुद्राचा गुरू 'व्यंकटेश'. देव [४०] चांदोरकर [४१] मात्र व्यांकटनाथ' हे नाव देतात. त्याच्या गुरूबद्दल आणि गुरुपरंपरेबद्दल अजून शोध घ्यावयास हवा. चंद्रात्मज रुद्राचे आजेगुरू 'रामानंद' हे 'संपादण्या' कार रामानंदाहून वेगळे मानावे लागतात. चंद्रात्मज हा मुडलगी परंपरेत येत नसला तरी नात्याने आणि विशेषतः 'दत्त' परंपरेमुळे, 'मुनी' आणि 'प्रभू' या पदांवरील त्याच्या अधिकारामुळे मुडलगी- परंपरेशी निगडित आहे.[४२]

आवळीकरांनी यासंबंधी केलेले विवेचन या संदर्भात महत्त्वाचे ठरावे :

'उद्योगपर्वा' च्या सद्गुरुस्तवनात तो 'बोधकला', 'बोधसुधा' हे शब्द वापरतो. मुडलगी-मठात त्याची जी पदे मला मिळाली त्यांपैकी एकात 'श्रीदेशिककृपा' आणि 'बोधसुधारस' हे शब्द आढळतात. त्यावरूनही त्याचा मुडलगी-परंपरेशी निकटचा संबंध दिसतो. त्याच्या त्रुटित 'दत्ताष्टका' वरून त्याचा दत्तसंप्रदायाशी संबंध दिसतो. स्वतःला तो 'चंद्रात्मज प्रभू' असेही म्हणवून घेतो. यातील 'प्रभू' हे पदही दत्तसंप्रदायाच्या एका शाखेशी

---

३९. पूर्वोक्त, गुलबर्गा गॅझेटियर, पृ. २०२.

४०. भा. इ. सं. मं., षाण्मासिक इतिवृत्त, श. १८३४, पृ. १६८.

४१. सत्कविकाव्यसूचि, पृ. ३५

४२. 'उद्योगपर्वा' ची आणि नमनाची सुरुवातच त्याने 'देशिक'पासून केलेली आहे.

निगडित आहे. अल्लमप्रभू, गोविंदप्रभू, माणिकप्रभू या नावांतील 'प्रभू' या पदाचा जो एक विशिष्ट अर्थ आहे त्याची चर्चा येथे करीत नाही. फक्त चंद्रात्मजाने स्वतःला 'प्रभु' असे म्हणवून घेणे हे फार महत्त्वाचे आहे एवढेच येथे नमूद करतो. त्याच्या दोन्ही पदांतील तत्त्वज्ञान हे 'विवेकसिंधू' च्या वाचन-मननातून आलेले आहे. त्याचा गुरू कोणी व्यंकटेश असला तरी नात्यामुळे आणि 'विवेकसिंधू'च्या प्रेमामुळे त्याला मुडलगी- परंपरेतही स्थान देणे जरुरीचे आहे."[४३]

'साक्षाद्दत्त मुकुंदराज मुनि', 'मुकोंदो मुनि' या निर्देशांच्या[४४] पार्श्वभूमीवर 'चंद्रात्मज रुद्र मुनी' हा उल्लेख फार बोलका ठरतो. 'विवेकसिंधू' चा परिणाम म्हणून काही शब्द 'उद्योगपर्वा' त येतात आणि तत्त्वज्ञानाचा प्रभाव दिसतो तो सच्चिदानंद-संकल्पनेच्या निरूपणात (१२.१३८-१४१). चंद्रात्मज रूद्राच्या या ओव्या 'विवेकसिंधू' तील 'सच्चिदानंदपदत्रयाविवरण' या सतरावे (अ) प्रकरणाशी[४५] तुळून पाहण्यासारख्या आहेत.

दत्तांचा 'वास' असलेल्या 'क्षेत्रात' : क्षेत्रांच्या परिसरात श्वास घेणाऱ्या चंद्रात्मज रुद्राला सर्वच गुरू 'दत्त' आहे. मुक्तेश्वर त्याला वंद्य वाटतो तो 'कवी' म्हणून. तआच अ. का. प्रियोळकरांनी म्हटल्याप्रमाणे 'कवी मुक्तेश्वर दत्ताला शिवस्वरूपच मानतो"[४६]

चंद्रात्मज रुद्राने या पट्पद्यांचा अनुवाद (३.१३८-१४१) सुरेख केला आहे.

'मुख्य गुरु उपासनी' हे चंद्रात्मजाचे सूत्र (१२-१५०) असले, तरी 'दत्तात्रयो हरि साक्षात' हा दत्तस्तोत्रातील चरण म्हणजे त्याचे आचरण आहे. या चरणाचा 'दत्तात्रयो हरिः कृष्णो' असाही पाठ आहे. दत्त आणि कृष्ण यांचे हे अद्वैत चंद्रात्मजाचे अवधान कुमारव्यासांच्या कृष्णकथेकडे वेधून घेते आणि चंद्रात्मज मग साहजिकच कुमारव्यासांना अनुसरतो; अनुवादितो.

('अक्षर', १० वी गल्ली, राजारामपुरी, कोल्हापूर ४१६००८.)

---

४३. मुडलगीचे स्वामी, पृ. ४८.

४४. तत्रैव, पृ. १३१ आणि १०७. चंद्रात्मज स्वतः : 'मुकुंद मुनी'-च म्हणतो.

४५. श्री विवेकसिंधु, (सं) कृ. पां. कुलकर्णी, पृ. ३६०-३६७.

*सत्पद तेचि निराकार । चित्पद मायेचा साकार ।*
*परि ते साकार निर्विकार । आदि अनादी स्वतसिद्ध ॥ १३८ ॥*
*मुळीच सत्पद निर्गुण । तिची अर्धांगमाया पूर्ण ।*
*यास्तव न म्हणवे सगुण । न निर्गुण कैसे हो ॥ १३९ ॥*
*निर्गुण ईछा निर्माण । त्रिभुवनातें तेचि कारण ।*
*कार्यरूप भासे संपूर्ण । प्रत्यक्ष सगुण ब्रह्मांडी ॥ १४० ॥*
*चित्पद माया ययापरी । सगुण रूप अजाढ्य पुरीं ।*
*दावोनि मायेची लहरी । अदृश्य कुसरी प्रळयांती ॥ १४१ ॥*

४६. श्री मुक्तेश्वराचा शोध. पृ. २१. आदिपर्व, (सं.) अ. का. प्रियोळकर, मुंबई.

डॉ. प्रल्हाद अ. कुलकर्णी

# विल्यम गोल्डिंग आणि सागर

विसाव्या शतकातल्या नामवंत प्रतिभावान साहित्यिकांमध्ये नुकत्याच दिवंगत झालेल्या सर विल्यम गोल्डिंग यांचा उल्लेख विशेषत्वाने करावा लागेल. १९८३ चे साहित्याचे नोबेल पारितोषिक मिळविणाऱ्या या साहित्यिकाने आपली साहित्याराधना १९३४ पासूनच सुरू केल्याचे दिसून येते. पुढे काव्याचा प्रांत सोडून देऊन या साहित्य मुशाफिराने कादंबरीचा प्रांत पादाक्रांत केल्याचे दिसून येते. १९३४ नंतर वीस वर्षांनी त्यांनी आपली पहिली कादंबरी ल्वॉर्ड ऑफ दि फ्लाईज १९५४ मध्ये प्रसिद्ध केली आणि नंतर १९८९ पर्यंत अकरा कादंबऱ्या त्यांनी प्रसिद्ध केल्या. या सर्व कादंबऱ्यांतून एक गोष्ट प्रकर्षाने जाणवते ती ही की, त्यांत समुद्राचे चित्रण सातत्याने आलेले आहे काही ठिकाणी प्रत्यक्ष समुद्र नसला तरी पाणी हा घटक आलेला आहे. बालपण आणि जाणतेपणाचा बराचसा भाग सागराच्या संगतीत, सहवासात आणि सान्निध्यात घालविलेल्या त्यांच्या मनाला सागराची भुरळ पडणे अत्यंत स्वाभाविक होय. दुसऱ्या महायुद्धात त्यांनी ब्रिटिश नौदलात काम केले. इथे त्यांना सागराची वेगवेगळी रूपे पाहता आली. त्यांनी एकदा स्वतः बोटीतून प्रवास केला. त्यातला चित्तथरारक अनुभव त्यांनी अनुभवला. या सागरप्रेमाबद्दल त्यांनीच एके ठिकाणी म्हटलेय :

'I was born by it. I've sailed on it, fought on it, swum in it, photographed under it, been frightened by it and done most things you can do apart from drown in it." [१].

'लॉर्ड ऑफ दि फ्लाईज' या कादंबरीचे कथानक लहान मुलांच्या माध्यमातून आकारत जाते. आणि या साऱ्या घटनांना त्या निर्जन बेटाच्या अवतीभवतीचा सागर साक्ष आहे. या बेटावर उतरलेल्या या लहान मुलांना सागर एक मोठा आधार वाटतो. रॉजर, जॅक, राल्फ, पिगी, सिमन ही या कथानकांतील प्रमुख पात्रे. विल्यम गोल्डिंग यांनी या लहान मुलांच्या माध्यमातून एकूणच मानवी जीवनाचा शोध घेण्याचा प्रयत्न केलेला आहे असे दिसते. या मुलांना या निर्जन बेटावरून आपली सुटका करण्यासाठी कोणीतरी येईल असे वाटत राहते. यासाठी ते एका डोंगरमाथ्यावर मोठी आग निर्माण करतात. ज्यामुळे दूरवरून जाणाऱ्या जहाजांना, बोटींना कळावे, त्यांचे लक्ष वेधले जावे असे त्यांना वाटते. पण तसे काहीच घडताना दिसत नाही. हळूहळू सुटकेची आशा संपुष्टात येऊ लागते. आणि कथानकाला गती प्राप्त होते. सागराच्या निळ्याशार पाण्यावरची गंभीरता, अंतर्गत उलथापालथ आता

बेटावरच्या मानवी मनाला ग्रासू लागलेली असते. मुलांच्या अंतर्मनातील वाईट प्रवृत्तींचा प्रभाव वाढू लागतो आणि समुद्राचे पाणी अधिकाधिक काळेभोर होत जाते. आपल्या संस्कृतीचे, चांगुलपणाचे, लोकशाहीचे जतन करण्याचे स्वप्न पाहणारी ही मुले कळत-नकळत स्वर्गाकडून नरकाकडे वाट चालू लागलेली असतात. विकृतीच्या हातातले खेळणे बनतात. परत एकदा ईडन गार्डन मध्ये आलेला सर्प सारे मानवी जीवन कलंकित करून जातो. सिमन आणि पिगी यांच्या रूपाने अस्तित्वात असलेले धार्मिक सात्त्विकत्व आणि बुद्धिवाद यांचा बळी घेतला जातो. सिमनचे मृत शरीर सागराच्या लाटांबरोबर सरकताना जणू पृथ्वीवरील सारी पवित्र सात्त्विकताच धुऊन जात आहे असे वाटत राहते. परत एकदा 'ज्ञानवृक्षा'वरील 'सफरचंद' चाखले जाते. आणि जॅकच्या रूपाने सैतानी प्रवृत्ती साऱ्या बेटावर राज्य करू लागते. राल्फ, पिगी, सिमन ही मानवी संस्कृतीची मूल्ये, नैतिक आधार जतन करण्यासाठी धडपडत असतात; पण या साऱ्या प्रयत्नांना जॅक आणि त्याचे अनुयायी सुरुंग लावतात. आपली तोंडे रंगवून, निर्माण केलेले सहारे उद्ध्वस्त करून रानटीपणाची परिसीमा ते गाठतात. खून करणे, रक्त सांडणे, प्राण्यांना आणि प्रसंगी सिमनला पण खेळवून मारणे यातला विकृत आनंद आता ती मुले घेऊ लागतात. पिगीच्या मृत्यूत त्यांना दुःख होत नाही. फक्त एकटा राल्फ या साऱ्या प्रकारांना घाबरलेला आहे. शेवटी यातून सुटका करून घ्यावी म्हणून लपतछपत, धावत-पळत तो समुद्रकाठी येतो आणि समुद्राच्याच साक्षीने एक सैनिक त्या सर्वांना सोडविण्यासाठी येतो. परत एकदा पाणी आशावादाचे प्रतीक बनते. पाणी पापक्षालनार्थ आलेले आहे असे दिसते.

विल्यम गोल्डिंग यांची १९५५ साली प्रसिद्ध झालेली दुसरी कादंबरी म्हणजे **दि इनहेरिटर्स**. अगदी मानवी जीवनाच्या आजच्या अवस्थेपूर्वीच्या कालखंडातील जीवनाचा आलेख घेणारी ही कादंबरी. आजच्या स्वरूपात दिसणारा मानव जेव्हा अजून विकसित झालेला नव्हता, आजच्यासारखी भाषा त्याला अवगत झालेली नव्हती अशा अवस्थेतील जीवनाचे चित्रण त्यांनी इथे केलेले आहे. सत्-असत्, भले-बुरे, बरे-वाईट यांतील अनंतकाल चालणाऱ्या संघर्षाचे एक जिवंत चित्रण इथे पाहावयास सापडते. निअँडरथलर्स आणि त्याच्यापेक्षा सापेक्षाने थोडा प्रगत अवस्थेत विकसित झालेला होमोसॅपियन मानव यांतील संघर्ष ही कथा. या कादंबरीतदेखील सागर आहेच. तो अपरिहार्य वाटावा अशा तऱ्हेने आविष्कृत झालेला आहे. शांत, पापभिरू, दुसऱ्याची हत्या करणे वाईट समजणाऱ्या, नैतिक मूल्यांची जाण असणाऱ्या निअँडरथलर्सना अखेर समुद्रमार्गे आलेल्या होमोसॅपियनकडून पराभव पत्करावा लागतो. थोड्या प्रगत ज्ञानाच्या, शस्त्राच्या साहाय्याने निअँडरथलर्सना पूर्णपणे नामशेष करण्यात होमोसॅपियन्स यशस्वी झालेले दिसतात. प्रथम जेव्हा निअँडरथलर्स विसाव्यासाठी येतात, तेव्हा त्यांना पाणी ओलांडण्यासाठीचा ओंडका गायब झालेला दिसतो आणि इथेच 'दुसऱ्या'ची चाहूल त्यांना लागते. प्रगत ज्ञानाचा वसा घेतलेले,

पापाची तमा न बाळगणारे, नैतिक मूल्यांची चिंता नसलेले, मुक्त वातावरणाची प्रथा असलेले हे होमोसॅपियन्स समुद्रमार्गेच येतात आणि विध्वंसाची प्रचीती आणून देतात. लोक (Lok) या निअँडरथलची पत्नी फा (Fa) शेवटी झाडाच्या फांदीवर पडून खाली समुद्राच्या पाण्यात पडते आणि तिच्या मृत्यूत या शांत, निर्मळ, चांगल्या जमातीचाच शेवट होतो. सागराच्या अंतरंगातले एक वादळ पृथ्वीवर अवतरते आणि चांगुलपणाचा विध्वंस करून टाकते. वाईट गोष्टींचाच वारसा पुढे चालू रहावा असे दिसते. शेवटी कधीही न संपेल अशा अंधकाराची किनार लाभलेल्या समुद्रातूनच होमोसॅपिअन्स प्रवासाला निघतात.

समुद्र हा विल्यम गोल्डिंग यांच्या साहित्यातील अनिवार्य भाग. त्याची विशालता, अथांगपणा, त्याचे रौद्ररूप या साऱ्यांची त्यांना आवड. लहानपणापासून पाहिलेला आणि जाणिवेतून अनुभवलेला समुद्र त्यांनी आपल्या शब्दसामर्थ्याने विलक्षण स्वरूपात साकार केलेला आहे. त्याला जिवंतपणाचे परिमाण प्राप्त करून दिलेले आहे. मग तो 'लॉर्ड ऑफ दि फ्लाईज' मध्ये अवतरणारा सुंदर, स्वर्गीय आनंद देणारा, शेवटी सुटका करणारा समद्र असो अथवा बोटींतून होमोसॅपियनना आणणारा, एका शांत, पापभिरू, चांगुलपणाच्या जीवनाला संपविणारा सागर असो तो गोल्डिंग यांनी निश्चितपणे प्रभावी रूपाने आविष्कृत केलेला आहे असे वाटते.

**संदर्भ**

१. Daily Telegraph (London), 15 Oct. 1980.

(९२, अनिल निवास, स्वरूप टॉकिजजवळ, शिवाजीनगर, सांगली - ४१६४१६.)





अनुक्रमणिका



प्रा. गो. म. कुलकर्णी

# मराठी आणि कन्नड या भाषांचे सामंजस्य अत्यंत आवश्यक

कर्नाटक-महाराष्ट्राच्या, अनादि कालापासून चालत आलेल्या मूलात्मस्वरूपाच्या विविध स्नेहग्रंथी आहेत. त्या आज थोड्याफार सैल झाल्यासारख्या वाटत असल्या, काही प्रमाणात त्यांची आज रस्सीखेच चाललेली असली तरी, ती तात्पुरती, अल्पकाळापुरती आहे, आज ना उद्या, या दोन उपसंस्कृतींचे मूलात्म ऐक्य प्रस्थापित झाल्याशिवाय राहणार नाही, असा माझा दृढ विश्वास आहे.

भारत स्वतंत्र होऊन आता जवळजवळ अर्धशतक होत आले आहे. आपण स्वतंत्र भारताची जी घटना बनविली आहे, ती लोकशाही स्वरूपाची आहे. तीत स्वातंत्र्य, समता आणि बंधुता या मूल्यत्रयीला अग्रस्थान आहे. या मूल्यत्रयींचे यथायोग्य वितरण व्हावे, यासाठीच भाषावार प्रांतरचनेच्या तत्त्वाचा आपण स्वीकार करून हे तत्त्व कार्यवाहीत आणण्याचा प्रयत्न चालविला आहे. भारतातील प्रत्येक भाषकाला किंवा भाषिक गटाला, स्वभाषेच्या माध्यमातून स्वतःचा व पर्यायाने सर्व भारताचा सर्वांगीण विकास साधावयाचा आहे. हे मूलभूत तत्त्व कार्यकर होण्याच्या दृष्टीने विविध भाषांच्या संदर्भात, 'साहित्य अकादमी', 'नॅशनल बुक ट्रस्ट' यांसारखे काही उपक्रमही कार्यवाहीत आणले गेले आहेत. समाजाला साक्षर करण्यास, त्या दृष्टीने नवी पाठ्यपुस्तके निर्माण करण्यास, प्रारंभही झाला आहे. साहित्य-संस्कृती मंडळाची स्थापना, लेखकांना दिले जाणारे पुरस्कार, विविध अनुदाने, प्रादेशिक विद्यापीठांची निर्मिती इत्यादींना चालना देण्याचे जे उपक्रम होत आहेत ते, याच उद्देशाने.

पण खेदाची गोष्ट अशी की, या बाबतीत आपण केलेल्या प्रतिज्ञा आणि त्यांची फलश्रुती, यांचा साकल्याने विचार करता, अपेक्षित यश आपल्या वाट्याला आलेले नाही. भाषा, प्रांत, धर्म, जात इत्यादी भेद विसरून ज्या एकात्म भावनेने आपण स्वातंत्र्यप्राप्तीसाठी लढा दिला, त्या भावनेला स्वातंत्र्योत्तर काळात तडा गेला आहे. धार्मिकता, जातीयता, प्रांतिकता, स्वार्थलोलुपता, सत्ताभिलाषा, भाषिक दुराभिमान इत्यादींनी आज आपल्याला ग्रासून टाकलेले आहे. 'हेचि फळ काय मम तपाला?' असे वारंवार म्हणण्याचे प्रसंग आपल्यावर गुजरत आहेत. साऱ्याच क्षेत्रांतील सारेच दीप मालवले गेले आहेत, असे नव्हे, पण ते मंदावत चालले आहेत. दिशाहीन झाल्यासारखे, कोंडीत सापडल्यासारखे







आपल्याला वाटत आहे. असे होण्याला अनेक कारणे आहेत, त्यांतील एक महत्त्वाचे कारण, स्वातंत्र्यासाठी एकत्र येऊन आपण जो लढा दिला, त्या लढ्याच्या काळात किंवा त्यानंतरही स्वातंत्र्योत्तर काळात आपण कोणते ध्येय स्वीकारणार आहोत, कोणती भाषिक, भौतिक व सांस्कृतिक उद्दिष्टे सिद्धीस नेणार आहोत, याचा निश्चित नकाशा आपल्यासमोर नव्हता. लोकशाहीचे सुंदर स्वप्न आपल्यासमोर होते; पण ते वास्तवात तितक्याच सुंदरपणे साकार कसे होईल, याचा विधायक दिशेने स्वातंत्र्यपूर्व काळात फारसा विचार झालेला नव्हता. जो काही विचार झाला होता, तो फार पुस्तकी, औपचारिक स्वरूपाचा होता. त्याला जीवनवास्तवाची, सखोल चिंतनाची जोड मिळाली नव्हती. हे सारे आपण कालौघावर सोपवलेले होते, आणि स्वातंत्र्यप्राप्तीनंतरही आपण या वस्तुस्थितीचा सर्वांगीण, सखोल विचार केलेला नाही.

भारतासारख्या बहुभाषक देशाला आपले भाषाविषयक प्रश्न सोडवावयाचे असतील, तर भाषाविषयक धोरणांचा मूलात्म पद्धतीने विचार करण्याची नितांत गरज आहे. त्यासाठी विविध अंगांनी विचार करावा लागेल. कारण, भारतातील कोणताही प्रदेश घेतला तरी तेथे राष्ट्रभाषा म्हणून हिंदीचा, उच्च ज्ञानभाषा म्हणून इंग्रजीचा, ज्या प्रांतात आपण राहतो, त्या प्रांतभाषेचा, त्या प्रांतात राहणाऱ्या, पण ज्यांची मातृभाषा वेगळी आहे, त्या भाषक समूहाचा, आपली प्राचीन धर्मपरंपरा समजून घेण्याच्या संदर्भात संस्कृतचा, या सर्वांचा समन्वय कसा साधावयाचा, हा एक यक्षप्रश्न बनून राहिलेला आहे. त्याकडे आपले जावे तेवढे लक्ष गेलेले नाही. (एवढे कशाला, स्वभाषेच्या विकासाचाही व्हावा तेवढा सखोल विचार झालेला नाही) हे स्पष्ट होण्याच्या दृष्टीने खुद्द महाराष्ट्राचेच आपण उदाहरण घेऊ. महाराष्ट्राने भाषावार प्रांतरचनेसाठी संयुक्त महाराष्ट्राची चळवळ उभी केली. प्रसंगोपात त्यासाठी रक्तही सांडले. संयुक्त महाराष्ट्रनिर्मिती होऊनही, काही जुजबी उपक्रम वगळता (साहित्य संस्कृती मंडळस्थापना, विश्वकोषनिर्मिती) महाराष्ट्र शासनाकडून, भाषा व साहित्य यांच्या विकासाचे ध्येय उराशी बाळगणाऱ्या महाराष्ट्रातील विविध संस्थांकडूनही काही योजनाबद्ध आश्वासक हालचाली होत असल्याचे दिसत नाही. आणि ज्या होत आहेत, त्या अद्यापि तरी औपचारिक पातळीवरच वावरत आहेत. मध्य महाराष्ट्र व विदर्भ, नागपूर, मराठवाडा, खानदेश, कोकण या सर्वांना कवेत घेऊन सर्वांना प्रेरक-पोषक ठरतील, असे किती भाषिक-सांस्कृतिक उपक्रम आणि संयुक्त महाराष्ट्रनिर्मितीनंतर हाती घेतले, त्यांची फलश्रुती काय ? या प्रश्नाचा आपण अंतर्मुख वृत्तीने विचार केलेला नाही. जगातील सर्व प्रकारची ज्ञानभांडारे उघडी होऊन त्यांद्वारा मराठी भाषा संपन्न करण्याचे योजनाबद्ध कार्यक्रम आपण अमलात आणलेले नाहीत. विश्वविद्यालयांच्या संख्येत तशी भर पडलेली आहे, पण या विश्वविद्यालयांतील विविध ज्ञानशाखांचा आणि मराठीचा कितपत सखोल आणि समृद्ध स्वरूपाचा संबंध साधता आला आहे ? खुद्द विश्वविद्यालयातील मराठीच्या अभ्यासपद्धतीत बदललेल्या



अनुक्रमणिका






सांस्कृतिक स्थितिगतीचा विचार करून मराठीचा अभ्यासक्रम सशक्त करण्याचे महाराष्ट्रात किती प्रमाणात सखोल आणि सर्वांगीण प्रयत्न झाले आहेत, या प्रश्नांचा विचार करता, त्यांची उत्तरे जवळजवळ नकारात्मक आहेत. कर्नाटकात मराठीची उपेक्षा होते, अशी आपण तक्रार करता, कन्नड शासनाला या उपेक्षेबद्दल पण जबाबदार धरता, ते रास्तही आहे. पण मराठी शासन असलेल्या महाराष्ट्रात मराठी भाषेची जी उपेक्षा चालली आहे, तीबद्दल आम्ही कोणाकडे दाद मागावी ? याला जबाबदार कोण ? महाराष्ट्रातील शासनव्यवस्था, की महाराष्ट्रातील विचारवंत मानली जाणारी मंडळी ?

महाराष्ट्रातच काय, पण भारतातील कोणत्याही भागात आपण गेलो तरी आपण देहाने जरी स्वतंत्र झालेले असलो, तरी मनाने पारतंत्र्यकालातील वृत्तीचेच राहिलो आहोत. आम्हाला पुश्किन माहीत असतो, पण पुरंदरदास कोण होता, याचा पत्ता नसतो ! आपण स्वतःला 'लोकशाहीवादी' म्हणवतो खरे, पण लोकशाहीचे लोकसंस्कृतीशी आणि लोकभाषेशी जिव्हाळ्याचे नाते असते, याचे पुरेसे भान आपल्याला आलेले नाही. या स्वातंत्र्योत्तर काळात वैध-अवैध मार्गाने सत्ता संपादन करणे आणि तिचा निरंकुशपणे उपभोग घेणे, हाच प्रधान जीवनव्यवहार बनला आहे आणि त्यासाठी भाषा, प्रांत, धर्मभावना यांसारख्या घटकांचे वैध-अवैध पद्धतीने उपयोजन होऊ लागले आहे. मूळ प्रश्नांना बग देण्याची प्रवृत्ती बळावत चालली आहे. कर्नाटक-महाराष्ट्रातील ताणतणावांचे हे एक प्रमु कारण आहे.

हीच प्रक्रिया, उलट दिशेने महाराष्ट्रातही चालू आहे. महाराष्ट्र प्रांतात राहणाऱ्या कन्नड भाषक विद्यार्थ्यांवर मराठीची सक्ती होत आहे. स्वातंत्र्यपूर्वकाळात महाराष्ट्रातील कन्नड-मराठीच्या सरहद्दीवरील भागांतील (सोलापूर, कोल्हापूर, सांगली इ.) महाविद्यालयांत कन्नड भाषेच्या अध्ययन-अध्यापनाची सोय होती, ती आज बव्हंशी लुप्त झाली आहे. असे प्रकार महाराष्ट्रात होऊ नयेत, कर्नाटकातील महाराष्ट्रीयांना ज्या सुविधा प्राप्त होण्याची गरज आहे, त्या सर्व सुविधा महाराष्ट्रातील कन्नड भाषकांना प्राप्त व्हाव्यात. कर्नाटक-महाराष्ट्रातील दूरदर्शनवर किंवा नभोवाणीवर मराठीला व कन्नडला योग्य ते प्रतिनिधित्व मिळावे, असे मराठी भाषकांचे म्हणणे आहे. कर्नाटकात आणि महाराष्ट्रात जशी उर्दू अकादमी स्थापन झाली आहे, तशी कर्नाटकात मराठी व महाराष्ट्रात कन्नड अकादमी स्थापन व्हावी, दोन्ही भाषांच्या अभ्यासाच्या सुविधा दोन्ही प्रांतांत निर्माण व्हाव्यात, अशी त्यांची तळमळीची मागणी आहे. कारण ही मागणी न्याय्य आहे, योग्य आहे, आणि या मागणीची परिपूर्ती झाल्यास, ती उभयप्रांतांतील सांस्कृतिक संवादाला, विकासाला परिपोषक होईल, या मुद्द्याबद्दल कुणाचाच तात्त्विक मतभेद असणार नाही. प्रश्न निर्माण होतो तो या बाबतीत अवलंबावयाच्या मार्गांबद्दल. दोन्ही प्रांतांत या बाबतीत जनमानसात जागृती घडवून आणून शासकीय पातळीवरून हा प्रश्न सोडविण्याचा प्रयत्न करावा, असे उत्तर, सकृत्दर्शनीच



अनुक्रमणिका

कुणाच्याही मनात येणारे आहे. ते योग्यही आहे, या मार्गाचा जमेल तेवढा अवलंब जरूर करावा, पण एवढ्याने आपला कार्यभाग सिद्धीस जाईल असे वाटत नाही, तसा आजवरचा अनुभवही नाही, यासाठी याबाबत जनमनांतच जागृती घडवून आणणे नितांत गरजेचे वाटते.

कारण, ज्याला आपण सर्वसामान्य नागरिक म्हणतो, तोच वस्तुतः त्या त्या संस्कृतीचा सावयवी घटक असतो. जिला आपण 'संस्कृती', 'संस्कृती' असे संबोधतो, ती जरी काही प्रमाणात भौतिक स्वरूपात, डोळ्यांना दिसत असली तरी, ती मनोमयसृष्टीशी संबंधित असते. ही संस्कृती समाजाची असो वा व्यक्तीची, ती मुख्यतः साकारते ती व्यक्तिमनात, व्यक्तिमनाच्या माध्यमातूनच ती पुढे समाजमनात संक्रांत होते. यासाठी व्यक्तिमने जसजशी जागृत होत जातील, तसतसा आपला या बाबतीतला कार्यभाग प्रभावीपणे सिद्धीस जाईल.

हे घडून कसे आणावयाचे? त्याचाही आपण विचार केला पाहिजे, मार्ग शोधले पाहिजेत. हे मार्ग जसे बाह्यस्वरूपाचे पाहिजेत, तसे हृदयपरिवर्तनात्मक स्वरूपाचेही हवेत. किंबहुना अग्रक्रम द्यावयास हवा, तो हृदयशुद्धीच्या, हृदयसंवादाच्या मार्गाला. सर्वांत सोपा, सर्वोपलब्ध, सर्वप्रभावी मार्ग म्हणजे साहित्यमार्ग. या मार्गाचा अवलंब करूनच पूर्वकालीन साधुसंतांनी भारतीय संस्कृतीच्या एकात्मतेचे पूर्वकाली भरणपोषण केले. नामदेवांसारखा, दक्षिणेकडील संत, उत्तरेकडील पंजाबशी हृदयसंवाद साधू शकला, तो या साहित्यमार्गाच्या बळावरच. हे माध्यम इतके प्रभावी असते की, त्यामुळे शत्रुत्वाचे रूपांतर मैत्रीत होऊ शकते. इंग्रजांचे व आपले राजकीय क्षेत्रात भांडण असूनही पारतंत्र्यकाळातच आपण शेक्सपीअरला डोक्यावर घेऊन नाचलो. टिळक-आगरकरांसारख्या कट्टर देशभक्तांना तुरुंगवासाच्या खडतर काळातही शेक्सपीअरच्या 'हॅम्लेट'चा अनुवाद करावा, असे वाटले.

नाना धर्म, भाषा, नाना पोटसंस्कृती यांनी गजबजलेल्या या देशात भारताच्या आंतरिक एकात्मतेचा धागा कायम ठेवावयाचा असेल, एवढेच नव्हे, तर तो वृद्धिंगत करावयाचा असेल, तर त्याला 'शब्द' हेच सर्वाधिक महत्त्वाचे माध्यम आहे. शब्दांची ही महती अनुभवल्यामुळेच तुकारामांसारखा संत,

*'आम्हां घरीं धन शब्दांचींच रत्ने । शब्दांचींच शस्त्रे यत्न करू ।*
*शब्दची आमुच्या जीवीचें जीवन । शब्दें वाटू धन जनलोकां ।*
*तुका म्हणे पाहा शब्दची हा देव । शब्देंचि गौरव पूजा करू ।'*

असे शब्दांबद्दलचे, साहित्याबद्दलचे उद्गार काढतो. मात्र याबाबत एकच महत्त्वाची अट आहे आणि ती म्हणजे ही शब्दोपासना किंवा साहित्योपासना व्रताचारी वृत्तीतून जन्माला येण्याची. या व्रताचारी वृत्तीने जर आपण साहित्यमार्गाची कास धरली, तर आपल्या मूळ उद्दिष्टाची परिपूर्ती होण्यास फार मोठे साह्य होईल. याच्या प्रत्यंतरासाठी आपल्याला फार

दूर जावयास नको. आजच्या कर्नाटक-महाराष्ट्र संदर्भात निरनिराळ्या प्रकारचे तणाव निर्माण झालेले असूनही गिरीश कर्नाड, शिवराम कारंथ, बहिरप्पा, शांतिनाथ देसाई प्रभृतींच्या, अलीकडेच मराठीत अनुवादित झालेल्या साहित्याचे आपण मनापासून स्वागत करतो, कौतुक करतो. आजच्या मराठी कादंबरीपेक्षा आजची कन्नड कादंबरी अधिक वरच्या दर्जाची आहे, हे मोकळेपणाने मान्य करतो, मराठीतील एक मान्यवर लेखक पु.ल. देशपांडे यांच्या विनोदी साहित्याचा कन्नडमध्ये नुकताच जो अनुवाद झाला आहे, त्याचे कन्नड भाषकांनी खूप कौतुक चालविले आहे, असे या अनुवादाचे कर्ते, कन्नड-मराठीचे एक थोर अभिज्ञ, डॉ. अ. रा. तोरो यांनी मला सांगितले, हे केवढे सुचिन्ह आहे. मूळ कर्नाटकचे रहिवासी भीमसेन जोशी, कुमार गंधर्व, गंगूबाई हनगल, बसवराज राजगुरू, मल्लिकार्जुन मन्सूर यांसारख्या गानक्षेत्रातील बुजुर्ग मंडळींचे आपण कौतुक करीत आलो आहोत, याची या प्रसंगी आठवण करून द्यावीशी वाटते. साहित्य वा साहित्येतर कला, कोणत्या प्रकारची किमया करू शकतात, याची यावरून कल्पना यावी. अलीकडेच पुण्यात स्थापन झालेल्या 'कन्नड मराठी स्नेहसंवर्धक मंडळा'ने पुण्यातील कन्नड आणि मराठी भाषकांत अगदी अल्पावधीत सौहार्द निर्माण केल्याचे मी अनुभवीत आहे.

या दृष्टीने विचार करता, कन्नड-मराठी नाते दृढ करणे तर आवश्यक आहेच, पण ते एक प्रकारे सुलभ आणि सोपेही आहे. कारण, या दोन्ही उपसंस्कृती, एकाच मूळ संस्कृतीच्या दोन बाजू आहेत किंवा एकाच संस्कृतीची दोन उपांगे आहेत, अशी इतिहासाची साक्ष आहे, पण याचे आपल्याला असावे तेवढे भान नाही. कन्नड भाषा ही मराठी भाषेपेक्षा वयाने ज्येष्ठ आहे, तिचे काही संस्कार मराठी भाषेवर झालेले आहेत, ही वस्तुस्थिती आहे, परंतु कन्नड संस्कृती ही केवळ द्रविडांची आहे, आणि मराठी संस्कृती आर्योद्भव आहे म्हणजेच ती कन्नड संस्कृतीहून श्रेष्ठ आहे, असाच ग्रह बऱ्याच कालच्या व आजच्या सुशिक्षित मराठी माणसांच्या मनातही ठाण मांडून बसला आहे. यामुळे मराठी भाषेत काही कन्नड शब्द, काही कन्नड भाषाप्रयोग रुजलेले आहेत. 'ज्ञानेश्वरी'सारख्या ग्रंथात काही कन्नड शब्द आढळतात. महाराष्ट्रातील अनेक खेड्यांच्या नावांची उपपत्ती द्रविड भाषेशी संबद्ध आहे, असे कोणी सुचविल्यास, सांगितल्यास मराठी भाषेच्या कडव्या अभिमान्याला धक्का बसतो, तो अस्वस्थ होतो, याची प्रचीती, शं. वा. जोशी यांच्या 'मऱ्हाटी संस्कृती' या ग्रंथाच्या बाबतीत किंवा विश्वनाथ खैरे यांच्या या संदर्भातील काही विधानांच्या संदर्भात, महाराष्ट्रात केवढा गदारोळ माजला होता; याची आपल्यापैकी अनेकांना कल्पना असेलच. कर्नाटक–महाराष्ट्राच्या पूर्वसंस्कृतीचा इतिहास-भूगोल योग्य प्रकारे समजून घेण्याची किती नितांत गरज आहे, याची यावरून कल्पना यावी.

कर्नाटक आणि महाराष्ट्र हे भौगोलिकदृष्ट्या तर एकाच भूखंडाची अपत्ये आहेतच, एवढेच नव्हे, तर राजकीयदृष्ट्याही हे भूभाग दीर्घकाल एकाच छत्राखाली नांदत होते.

इ.स.च्या पहिल्या शतकापासून पंधराव्या-सोळाव्या शतकापर्यंत ज्या विविध राजवटी (सातवाहन, कंदब, चालुक्य, राष्ट्रकूट, होयसळ, यादव, मुसलमान, मराठे) येथे होऊन गेल्या, त्या ्या दोन्हीही भूप्रदेशांना समान अशाच होत्या. पूर्वकालीन शिलालेखांतून, ग्रंथनिर्मितीतून याचीच साक्ष पटते. यामुळे राजकारणाच्या क्षेत्रातील विविध अनुभव उभयतांना समान असेच होते; अठराव्या-एकोणिसाव्या शतकात येथे जी इंग्रजी राजवट उदित झाली, तिचेही स्वातंत्र्यप्राप्तीपर्यंत उभयप्रदेशांवर सारखेच वर्चस्व होते. शहाजीराजे यांचे दीर्घकाल बेंगळुरास वास्तव्य होते आणि पेशवेकालात मुधोळ, जमखंडी, रामदुर्ग, जत यांसारखा आजच्या कर्नाटकातील भूभाग, पेशव्यांच्या व पेशवेकालानंतर निर्माण झालेल्या संस्थानिकांच्या अखत्यारीखाली होता; यातूनही मराठी–कन्नड संस्कृतीत काही आदानप्रदान घडून आलेले आहे.

याहीपेक्षा महत्त्वाची बाब अशी की, या दोन्ही प्रदेशांतील लोकसंस्कृती, देवदेवता यांतही समानत्व आढळते. महाराष्ट्रातील वारकरीपंथाच्या आद्यदैवताला, श्रीविठ्ठलाला 'कानडा विठ्ठल' असे संबोधिले जाते, हे सर्वपरिचितच आहे. यल्लम्मा, खंडोबा, शाकंबरी यांसारख्या देवदेवतांचे उपासक दोन्ही प्रांतांत आहेत. दोन्ही प्रांतांतील रीतरिवाजात, सोयरिकीत समान धागे गुंफलेले आढळतात. महाराष्ट्रात वैदिक परंपरेचा प्रतिपाळ करणारी जी आचार्यकुले आहेत, ती दक्षिणेतून आली आहेत. कर्नाटकात फार मोठी मान्यता पावलेल्या लिंगायत धर्माचा प्रवर्तक श्रीबसवेश्वर यांचा महाराष्ट्रातील मंगळवेढ्याशी संबंध होता. ज्ञानेश्वरांची एक परंपरा, विजापूर जिल्ह्यातील डंबळ येथे वास्तव्य करून होती. महाराष्ट्रातील एक थोर संत 'महाराष्ट्रमहोदयां'चे प्रवर्तक श्रीएकनाथ महाराज यांच्या पत्नीचे माहेर कर्नाटकात होते, आणि एकनाथांचा नातू, मराठीतील एक श्रेष्ठ पंडित कवी, मुक्तेश्वर, याचे बालपण कर्नाटकात गेले होते. त्याच्या 'महाभारत' रचनेवर कन्नडमधील महाभारत रचनेचा प्रभाव असल्याचे वाङ्मयेतिहासकारांनी दाखवून दिलेले आहे. वीरशैवांचे शिरोमणी श्रीमन्मथनाथ यांनी, मराठीतही काही रचना केली आहे. शिवरामस्वामींसारखा मराठीतील एक थोर कवी, कर्नाटकातच होऊन गेला. 'रसकौमुदी' हा मराठीतील रसविद्येवरील आद्यग्रंथ, कर्नाटकातच निर्माण झाला. मूडलगींच्या स्वामींची मराठीतील ग्रंथरचना कर्नाटकातच निर्माण झाली, रामदासांचे काही मठ कर्नाटकात आहेत, विठोबाअण्णा दप्तरदारांचे मूळ वास्तव्यस्थळ बीदर आहे. हा जुना काळ सोडून आधुनिक काळाकडे वळल्यास, भावे-किर्लोस्कर प्रणीत मराठी रंगभूमीच्या प्रेरणास्थानी कन्नड रंगभूमी आहे, हे सर्वज्ञातच आहे. आधुनिक मराठी रंगभूमीचे प्रवर्तक अण्णासाहेब किर्लोस्कर हे मूळचे कर्नाटकातीलच. आधुनिक मराठीत क्रांती घडवून आणणारे 'केशवसुत' व नवकाव्याचे प्रवर्तक बा. सी. मर्ढेकर यांचे वास्तव्य काही काळ धारवाडात झाले होते. मराठीतील एक थोर कथाकार जी. ए. कुलकर्णी हे कर्नाटकाचे रहिवासी, कविवर्य द. रा. बेंद्रे,

श्रीरंग जहागीरदार या कर्नाटकातील थोर लेखकांचे महाराष्ट्राशी जिव्हाळ्याचे नाते आढळते. आजही डॉ. भीमाशंकर देशपांडे यांच्यासारखे संशोधक, कर्नाटकात राहूनच मराठीत संशोधनकार्य करीत आहेत. कर्नाटक–महाराष्ट्राच्या संस्कृतीशी व साहित्याशी संबद्ध असलेली गुरुदेव रा. द. रानडे, महर्षी विठ्ठल रामजी शिंदे, ज्योतिषाचार्य केतकर अशी कितीतरी नावे समोर येतात.

पूर्वकालचा हा भाग बाजूला ठेवला तरी आजही सोलापूर, कोल्हापूर, मिरज, सांगली या ठिकाणी अनेक कन्नड भाषक कुटुंबे दीर्घकालापासून वास्तव्य करून असल्याचे जसे आढळते, तसे आजच्या कर्नाटकातील गदग, हुबळी, धारवाड, बेळगाव, विजापूर, कारवार, बीदर, गुलबर्गा यांसारख्या ठिकाणी कितीतरी मराठी कुटुंबे पिढ्यानुपिढ्या वास्तव्य करून असल्याचे दृश्य दिसते. आजही नोकरी-धंद्याच्या निमित्ताने मुंबई–पुणे किंवा म्हैसूर-बेंगलोर येथे वास्तव्य करीत असलेली कितीतरी मराठी कुटुंबे आहेत. या सर्वांचे भाषाविषयक, शिक्षणविषयक, संस्कृतिविषयक गुंतागुंतीचे विविध प्रश्न सोडविण्याच्या दृष्टीने, उभय प्रांतांतील अल्पसंख्याकांच्या मनात जी दुय्यम नागरिकत्वाची भावना घर करून राहिली आहे, ती दूर होण्याच्या दृष्टीने या उभय संस्कृतीतील साम्यस्थळांप्रमाणे, प्रकृतिजन्य भेदस्थळांचाही विचार होण्याची गरज आहे.

महाराष्ट्राच्या तुलनेने कर्नाटक हा कृषिसंपन्न प्रांत आहे, यामुळे येथील नागरिक हा वृत्तीने मृदू, शांतताप्रिय व स्वपरंपरेला चिकटून राहणारा आहे. परंतु तुलनेने ही वृत्ती महाराष्ट्रात कमी आढळते, कारण कर्नाटकाचा महाराष्ट्राच्या ज्या भूभागाशी संबंध आलेला आहे, तो महाराष्ट्राचा भूभाग, बव्हंशी डोंगराळ आहे; यासाठीच 'राकट देशा, कणखर देशा, दगडांच्या देशा' असे कवी गोविंदाग्रजांनी महाराष्ट्राचे वर्णन केले आहे. यामुळे महाराष्ट्राच्या या भूभागातील प्रकृतीत, कर्नाटकाच्या तुलनेने अधिक लढाऊ बाणा आढळतो. वृत्तीने तो एकांडा व युद्धप्रिय आहे. त्याने भारताच्या बऱ्याच भूभागांवर पूर्वकाळी राजकीय वर्चस्वही गाजविलेले आहे. त्यातून निर्माण होणारा एक अहंभाव अजूनही त्याच्या मनात दबून बसला आहे.

मुंबई बेटाच्या सान्निध्यामुळे, सर्वांच्या आधी प्राप्त झालेल्या रेल्वेसारख्या सुविधेमुळे, मुंबई विश्वविद्यालयाच्या स्थापनेमुळे, आधुनिकतेचे वारे कर्नाटकाच्या तुलनेने महाराष्ट्रात कितीतरी आधीपासून वाहत असल्यामुळे महाराष्ट्रीय मनात स्वश्रेष्ठत्वाचा, आधुनिक नागरत्वाचा, यातून निर्माण होणाऱ्या बुद्धिवादीपणाचा, वर्चस्वभावनेचा एक गंड निर्माण झाला आहे. यामुळे तो कन्नड माणसाला आपल्यापेक्षा कमी दर्जाचा लेखतो. कन्नड माणसाला सातत्याने विनोद विषय बनवितो. कन्नड माणसाच्या मनात यामुळे मराठी माणसाबद्दल दीर्घकाळ एक विरोधभावना, सुप्त वा प्रकट स्वरूपात वावरत आलेली आहे.

कर्नाटक-महाराष्ट्राची मध्ययुगातील सांस्कृतिक-धार्मिक जडणघडणही काही बाबतींत










भिन्न आहे. उदा. कर्नाटकात ज्याप्रमाणे शैव-वैष्णवांचा किंवा वैदिक-अवैदिक संस्कृतींचा संघर्ष आहे किंवा लिंगायत व जैन धर्मीयांचे प्राधान्य आहे, तसे महाराष्ट्रात नाही. वैष्णवांच्या 'मठ' संस्कृतीचा महाराष्ट्रात अभाव आहे. वारकरी संप्रदायामुळे असेल, किंवा अन्य कारणांमुळे असेल, पण कर्नाटकाच्या तुलनेने महाराष्ट्रात धार्मिक समन्वयाचे धोरण पूर्वकालापासूनच अधिक प्रमाणात, अस्तित्वात आलेले आढळते.

महाराष्ट्रीयांच्या तुलनेने कन्नड भाषकांच्या मनात कन्नड भाषेच्या उपेक्षेचे शल्य, फार पूर्वीपासून नांदत आलेले आहे. दीर्घकाळपर्यंत कन्नड भाषिक प्रदेश आंध्र प्रदेश, महाराष्ट्र, मद्रास, कुर्ग, म्हैसूर अशा राजवटींत विभागला गेला होता. या खंडिततेमुळे कन्नड भाषा व संस्कृती यांची उपेक्षा झाल्याचे शल्य कन्नड भाषकांच्या मनात दीर्घकाल घर करून राहिले आहे, यामुळे संयुक्त कर्नाटकाची निर्मिती होताक्षणी, त्याचा स्वभाषेचा अभिमान वाजवीपेक्षा अधिक प्रमाणात उफाळून वर आलेला आहे.

कन्नड-मराठी संदर्भातील हा सारा जमाखर्च लक्षात घेऊनच यापुढे कन्नड-मराठीचे सामरस्य कसे साधता येईल, याचा विचार आपण केला पाहिजे, त्या दिशेने पावले टाकली पाहिजेत. साहित्यिक माध्यमातून ज्या प्रमाणात परस्परांचा आंतरिक परिचय होत जाईल, हृदयसंवाद साधला जाईल, त्या प्रमाणात आपले अपेक्षित ध्येय सिद्धीस जाईल. परस्परांतील वाढत्या आदान-प्रदानांमुळे, तुलनात्मक विचाराने, उभयभाषांतील साहित्यनिर्मितीही अधिक कसदार होण्यास साह्य होईल.

उदाहरणार्थ, कर्नाटक हा परंपराप्रिय राहिल्यामुळे त्यातील साहित्याची मुळे जनमानसात खोलवर रुजली आहेत, तशी ती मराठी साहित्यात कशी रुजतील, हे मराठी साहित्यिकाने पाहिले पाहिजे. कन्नड साहित्यातील स्त्रीदर्शन मराठी साहित्याच्या तुलनेने, अधिक विविधतापूर्ण आहे, ही बाबही मराठी साहित्यिकांच्या लक्षात आणून देण्याची, तिची कारणमीमांसा करण्याची गरज आहे. मराठी साहित्यातील विनोदबुद्धीच्या अवलंबनातून व मराठी रंगभूमीच्या प्रयोगप्रवणतेच्या अनुसरणातून कन्नड रंगभूमीलाही काही शिकता येईल. आजचे प्रसिद्ध कन्नड नाटककार गिरीश कर्नाड यांच्या नाटकांचे कन्नड नाट्यसृष्टीपेक्षा मराठी नाट्यसृष्टीत अधिक समर्पकपणे सादरीकरण झाले आहे, ही वस्तुस्थिती कन्नड साहित्यिकांनी लक्षात घेण्यासारखी आहे. आपल्या प्रस्तुत प्रश्नांच्या संदर्भात श्री. कर्नाड यांचे उदाहरण विशेषच बोलके आहे. कर्नाडांची मातृभाषा कोकणी, शिक्षण इंग्रजीतून, नाट्यलेखन कन्नडमधून आणि त्यांच्या नाटकांचे अनुवादरूपात यशस्वी सादरीकरण मराठीतून, अशी वस्तुस्थिती आहे. ती अंगभूतपणेच कितीतरी बोलकी आहे.

फुले-आंबेडकरांच्यामुळे दलित साहित्याच्या प्रेरणा आणि प्रवृत्तीचा उगम, इतर कोणत्याही प्रांतापेक्षा जरी महाराष्ट्रात अधिक प्रमाणात झालेला असला, तरी मराठी दलित साहित्यात कालांतराने जे एकांडेपण शिरले, त्याचा अभाव या प्रकारच्या कन्नडमधील बंडाय



अनुक्रमणिका

साहित्यात आढळतो. ही बाबही मराठीतील दलित लेखकांनी लक्षात घेण्यासारखी आहे.

कर्नाटकशासन कन्नड भाषेच्या व संस्कृतीच्या समृद्धीसाठी कन्नड स्वतंत्र विद्यापीठाची निर्मिती करते. संशोधनाला, साहित्यप्रकाशनाला भरघोस मदत देते. साहित्यिकांना विविध सुविधा उपलब्ध करून देते. ही बाबही मराठी शासनाने मराठी साहित्य-संस्कृतीच्या विकासाच्या अनुरोधाने विचारात घेण्यासारखी आहे.

खरे तर आजच्या स्वतंत्र बहुभाषक भारतात तौलनिक साहित्याभ्यासाचीही नितांत गरज आहे. याखेरीज आजच्या भारतातील संवेदनास्वरूपाबाबत या संवेदनांच्या आकृतिबंधांबाबत आपल्याला नीट कल्पना येणार नाही, उदा. दलित जागृतीची किंवा स्त्रीमुक्तीची चळवळ आज कमी-अधिक प्रमाणात भारतभर चालू आहे; या चळवळीतील बाह्य उपक्रमांची माहिती कदाचित आपल्याला मिळू शकेल; पण वस्तुतः आज या चळवळींचे अंतरंग समजून घ्यावयाचे झाल्यास, या विषयावर त्याच्या प्रदेशावरील ललितसाहित्यच उपयुक्त ठरणारे आहे. म्हणून तौलनिक साहित्याचा हा मुद्दा मला विशेष महत्त्वाचा वाटतो. मराठी दलित साहित्याचा परामर्श घेण्याच्या संदर्भात, मी या बाबतीतील इतर भाषांतील स्थितिगती पडताळून पाहण्याचा प्रयत्न करून पाहिला, पण त्यात अपेक्षित यश मला लाभू शकले नाही, हे मुद्दाम नमूद करावेसे वाटते.

विविध प्रदेशांतील केवळ साहित्याचा आशयच नव्हे, तर त्याच्या आविष्कारदिशाही समजून घेणे आवश्यक आहे. त्याखेरीज स्वतःला स्वतःच्या साहित्यविश्वाचेही नीट आकलन होणार नाही, असे मला वाटते. उदा. मराठीत महाकाव्ये का निर्माण होत नाहीत, हा प्रश्न, मराठी समीक्षेत दीर्घकाळ चर्चिला गेला. या नव्या काळात आता महाकाव्याचे युगच संपले. आजचे युग भावकाव्याचे आहे असे एक उत्तर त्याला दिले गेले. या उत्तराने आम्ही आमचे समाधानही मानून घेत आलो आहोत, परंतु कन्नडमधील कूयम्पू किंवा गोकाक यांसारख्या आधुनिकतम विश्वाचा परिचय असलेल्या कवींनी आपल्या काळात कन्नडमध्ये अव्वल दर्जाची महाकाव्यनिर्मिती केली आहे, हे जेव्हा मी ऐकले-वाचले, तेव्हा आम्ही आमच्यापुरते दिलेले उत्तर अत्यंत असमाधानकारक आहे असे जाणवू लागले. मर्ढेकर मला थोडेफार कळतात, पण मर्ढेकरांच्या या नवकाव्याचे स्वरूप योग्य प्रकारे आकलन होण्याच्या दृष्टीने गोपाळकृष्ण अडिगासारख्या कन्नड नवकवींचे किंबहुना इतर भारतीय भाषांतील समकालीन नवकवींचे काव्य, अनुवादरूपाने आपल्यासमोर आल्यास आपल्या नवकल्पनांच्या आकलनाची लांबी, रुंदी वा खोली जाणून घेणे सुलभ होणार नाही का ? ते सुलभ होण्याच्या दृष्टीनेच 'आंतरभारती'ची सुंदर कल्पना, पूज्य साने गुरुजींनी मागेच आपणासमोर ठेविली आहे.

आंतरभारतीचे हे स्वप्न साकार करण्यासाठी प्रारंभबिंदू म्हणून आपल्या घरच्याच गोष्टींना, कन्नड-मराठी संबंधांना, सुविहित रूप देण्याच्या कार्यक्रमाला आपण अग्रक्रम देणे

तत्त्वतः आणि व्यवहारतः समुचित ठरेल. यासाठी पुढीलसारखा काही कार्यक्रम मी आपल्यापुढे विचारार्थ ठेवीत आहे.

(१) भाषावार प्रांतरचना करताना, कर्नाटक-महाराष्ट्राच्या बाबतीत ज्या काही त्रुटी राहिल्या असतील, त्या दूर करण्यासाठी संघटित प्रयत्न करणे, खेडे हा घटक कल्पून जिथे विशिष्ट संख्येने मराठी भाषक वा कन्नड भाषक नांदत असतील त्या भाषकांना, त्यांच्या भाषिक, सांस्कृतिक विकासासाठी त्या त्या शासनाकडून आवश्यक त्या सर्व सुविधा संबंधितांना कशा पुरविल्या जातील, हे पाहण्यासाठी प्रयत्नशील राहणे.

(२) पूर्वी असलेल्या या प्रकारच्या सुविधा आज ज्या ज्या ठिकाणी लुप्त झाल्या असतील, तेथे तेथे त्यांच्या पुनरुज्जीवनाचे प्रयत्न करणे.

(३) कर्नाटकात राहणाऱ्या मराठी भाषकांना, कर्नाटक प्रांत, कर्नाटक भाषा, इतिहास, संस्कृती, साहित्य, कला इत्यादींची माहिती देण्यासाठी ठिकठिकाणी केंद्रे स्थापन करणे, याच प्रकारची मराठी संस्कृतीची माहिती इतरांना कशी होईल हे पाहणे, त्या प्रकारची कार्यवाही अमलात आणणे; ग्रंथालयनिर्मिती, व्याख्यानमाला, चर्चासत्रे, प्रदर्शने इत्यादींच्या माध्यमांतून हे कार्य करता येईल.

(४) उभय प्रांतांतील साहित्यिकांशी जवळून संपर्क साधण्यासाठी, त्यांना एकत्र आणून आणि परस्परांतील विचारविनिमयाची संधी वारंवार उपलब्ध करून देणे.

(५) महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या शाखोपशाखांना व कर्नाटकातील तत्सम साहित्य संघटनांना यासाठी औपचारिक-अनौपचारिक पातळ्यांवरून प्रयत्न करण्यास प्रवृत्त करणे, या संदर्भातील दोन्ही प्रांतांतील आवश्यक ती माहिती एकत्रित सर्वांना उपलब्ध करून देणे, ती सर्वांना उपलब्ध होण्यासाठी महत्त्वाच्या ठिकाणी माहितीकेंद्रे उघडणे.

(६) दोन्ही भाषांच्या परिचयाचे, शिक्षणाचे वर्ग चालू करणे.

(७) मराठी व कन्नड अशा दोन भाषांतून एकाच प्रकारची माहिती देणारी नियतकालिके एकत्र स्वरूपात चालविणे.

(८) मराठी माध्यमातून उच्च शिक्षण घेऊ इच्छिणाऱ्यांसाठी विनाअनुदान पद्धतीचे महाविद्यालय स्थापन करणे. त्यासाठी योग्य अशा अभ्यासक्रमाची आखणी करणे.

(९) कर्नाटक राज्यातील विद्यापीठांतून आवश्यक तेथे मराठी विभागाची स्थापना करणे, या विभागातर्फे कर्नाटक भागात मराठी साहित्य-संस्कृतीच्या संदर्भातील संशोधनकार्याला चालना देणे.

(१०) महाराष्ट्रातही या प्रकारच्या सुविधा महाराष्ट्रातील कन्नड भाषकांकरता निर्माण करण्याचा प्रयत्न करणे.

(११) पूर्वी महाराष्ट्राच्या सरहद्दीवरील भागांतील (कोल्हापूर, सांगली, सोलापूर इ.) महाविद्यालयांतून कन्नडच्या अध्यापनासाठी प्राध्यापक नेमण्याची प्रथा होती आणि आज



अनुक्रमणिका

ती दुर्दैवाने लुप्त झाली आहे, तिचे पुनरुज्जीवन करणे. आज मुंबई विद्यापीठात कन्नड भाषेचा विभाग आहे, पण पुणे किंवा शिवाजी विद्यापीठात तो नाही, तो निर्माण करण्याची नितांत गरज आहे. आंतरप्रांतीय सांस्कृतिक आदान-प्रदानास त्याचे साह्य होईल.

(१२) कन्नड-मराठी भाषकांना परस्परांच्या सण-सोहळ्यांत उत्साहाने सामील होऊन अनौपचारिक पातळ्यांवरून परस्परांचे संबंध वाढीस लावणे.

(१३) दूरदर्शन, नभोवाणी यांसारख्या माध्यमांतून हे स्नेहवर्धक कार्य काही प्रमाणात का होईना, कसे सिद्धीस नेता येईल, याचा तपशील ठरविणे.

(१४) मुख्य म्हणजे, कन्नड आणि मराठीतील जुन्या-नव्या महत्त्वाच्या साहित्यकृती अनुवादरूपाने परस्परांना उपलब्ध करून दिल्यास, परस्परांत जवळीक निर्माण होण्यास कसे आणि किती साह्य होते, याचा यापूर्वी निर्देश केला आहेच, तथापि त्याचे महत्त्व जाणून त्याचा पुनरुच्चार करणे, आवश्यक वाटते.

(१५) यासाठी योजनापूर्वक कालबद्ध कार्यक्रम आखणे, या क्षेत्रात काम करू इच्छिणाऱ्यांची यादी करणे, त्यांच्याशी संपर्क साधणे, अनुवाद चांगले कसे होतील हे पाहण्यासाठी, या बाबतीत मार्गदर्शन करण्यासाठी कार्यशाळा स्थापन करणे गरजेचे आहे चांगल्या अनुवादांच्या उत्तेजनार्थ पुरस्कार देण्याची योजना आखावी. या दिशेने तातडीने हाती घेण्याजोगे पुढील दोन उपक्रम मला नमूद करावेसे वाटतात.

(अ) स्वातंत्र्योत्तर काळातील मराठी व कन्नड साहित्यामधील विविध वाङ्मयप्रकारांचा परिचय करून देणारा, परामर्श घेणारा, ग्रंथ सिद्ध करून तो पुढील संमेलनाच्या वेळी प्रकाशित करण्याची योजना आपण त्वरेने हाती घ्यावी.

(ब) कर्नाटक आणि महाराष्ट्र या दोन्ही प्रदेशांच्या उन्नतीसाठी ज्यांनी ज्यांनी विविध क्षेत्रांत कार्य केले, अशा व्यक्तींची वा संस्थांची माहिती एकत्र करून ती संपादित स्वरूपात प्रसिद्ध करावी.

या कार्यासाठी लागणारे द्रव्य कसे संपादन करता येईल, हेही पाहिले पाहिजे. उभय भाषांतील मंडळींना, संस्थांना, शासनाला ही प्रकाशने उपयुक्त ठरणारी असल्यामुळे कर्नाटक-महाराष्ट्रातील शासन, विविध व्यक्ती व संस्था यांना यासाठी आवाहन करावे.

योग्य दिशेने प्रयत्न केल्यास, दोन्ही प्रदेशांतील उद्योगपती अर्थसाहाय्यासाठी पुढे येतील असा विश्वास वाटतो. महाराष्ट्रातील सांस्कृतिक कार्यासाठी परदेशातील फोर्ड प्रतिष्ठान भरघोस साहाय्य देते, असा अनुभव आहे, तेव्हा या बाबतीत योग्य प्रकारे प्रयत्न केल्यास, भारतीय उद्योगपतींचेही आपणांस साहाय्य मिळेल, असा विश्वास वाटतो.

(गुलबर्गा येथे भरलेल्या दुसऱ्या कर्नाटक राज्य मराठी साहित्य संमेलनाच्या अध्यक्षपदावरून व्यक्त केलेले विचार)

(कलानगर, धनकवडी, पुणे ४११०४३.)



अनुक्रमणिका

## ग्रंथ परीक्षण

डॉ. जनार्दन वाघमारे

# श्रीराम गुंदेकर यांची वैशिष्ट्यपूर्ण ग्रामीण कथा

आजच्या ग्रामीण कथाकारांमध्ये श्रीराम गुंदेकरांचे नाव उल्लेखनीय आहे. 'उचल' हा गुंदेकरांचा पहिलाच कथासंग्रह आहे. या कथासंग्रहात एकूण अठरा कथा समाविष्ट आहेत. १९७३ ते १९८८ या पंधरा वर्षांच्या कालावधीमध्ये लिहिलेल्या आणि वेगवेगळ्या नियतकालिकांमध्ये प्रसिद्ध झालेल्या त्या कथा आहेत. या कथासंग्रहातील 'खंत' ही त्यांची पहिली कथा आहे, तर 'कळप' ही शेवटची.

ज्या कालखंडात या कथा लिहिल्या गेल्या त्या कालखंडात महाराष्ट्राच्या समाजजीवनात विविध स्वरूपांची स्थित्यंतरे घडत होती. अनेक आंदोलने आणि अभियानांनी अधोरेखित झालेला हा कालखंड होता. या कालखंडात एकीकडे जनसामान्यांच्या आणि प्रामुख्याने तरुणांच्या आशा-आकांक्षा वाढलेल्या होत्या, आणि दुसरीकडे त्यांच्या जीवनात कमालीची अस्थिरता आणि अस्वस्थता वाढलेली होती. संयुक्त महाराष्ट्राच्या निर्मितीनंतर ज्या पिढीला शिक्षणाचा लाभ मिळाला, ती पिढी १९७० च्या आगेमागे तारुण्याच्या उंबरठ्यावर उभी होती. नवनवीन विचारांचे वारे त्यांच्या बुद्धीला व मनाला झोंबत होते. नवनिर्मितीच्या आशा-आकांक्षांनी त्यांची मने भारावली होती आणि पेटलीही होती. नाकात वारे शिरलेल्या वासरांसारखी त्या तरुणांची अवस्था झाली होती. ग्रामीण भागातील तरुणही त्याला अपवाद नव्हते. काळाच्या पाऊलखुणा त्यांनाही दिसत होत्या.

या कालखंडात ग्रामीण भागातही शिक्षणाचा प्रसार वेगाने होत होता. जिल्ह्याच्याच नव्हे, तर तालुक्याच्या ठिकाणीदेखील महाविद्यालयीन शिक्षण विस्तारत होते. समाजाच्या अगदी तळाला ढवळून काढणाऱ्या वैचारिक व भावनिक झंझावातांनी तरुण वर्गाच्या स्पंदनाला स्पर्श केला होता. त्यांच्या मानसिक अवस्थेला शब्दरूप देण्याचाही प्रयत्न सुरू झाला होता. वाङ्मयाची क्षितिजे विस्तारत होती. ज्यांच्या घरात पिढ्यान्‌पिढ्यांपासून केवळ शेतीची अवजारे होती तिथे आता ग्रंथांना व लेखणीला स्थान मिळत होते.

या काळात तरुणांच्या डोळ्यांत स्वप्ने तरळत होती. पण त्याचबरोबर त्यांच्या










पायाखालचे वास्तवही भीषण स्वरूपाचे होते. सुलतानी आणि अस्मानीने निर्माण केलेल्या परिस्थितीशी त्यांना झुंजणे भाग होते. दर दोन-तीन वर्षांनी दुष्काळ हा ग्रामीण जनतेच्या पाचवीला पूजलेला असतोच. खेड्यापाड्यातील वरचा थर अर्थात परंपरेने चालत आलेला वतनदार वर्ग सत्तास्थानी हळूहळू येत होता. तो वर्ग अधिक शोषक बनत चालला होता. कुऱ्हाडीचा दांडा गोतास काळ, असे त्याचे वर्णन करावे लागेल. ग्रामीण समाज दारिद्र्यात अधिकात अधिक बुडत चालला होता. तो अधिकात अधिक कर्जबाजारी होत चालला होता. आपलेच दात आणि आपलेच ओठ अशा अवस्थेत तो सापडला होता. नोकरशाहीदेखील तितकीच क्रूर, भ्रष्ट आणि बेदरकार होती. पटवारी गेले आणि तलाठी आले. पाटील हेच सरपंच झाले किंवा ते सरपंचांना रबरी शिक्के म्हणून वापरू लागले. अशी ही वरच्या स्थानावरची मंडळी आपलेच उखळ पांढरे करण्यात गुंतली.

नाही म्हटले तरी ग्रामीण विभागात नवनवीन विकास योजना येऊ लागल्या. पण त्यांचा फायदा सामान्य शेतकरी आणि शेतमजूर यांना मिळणे कठीण झाले. पुढारी आणि भ्रष्ट नोकरशाहीच्या कचाट्यात ते सापडत गेले. या कालखंडात ग्रामीण जीवन झपाट्याने बदलत होते. पण त्या प्रमाणात शोषणही वाढत होते. गावात व शिवारात वीज येत होती, पण अंधार मात्र वाढतच होता.

शतकानुशतके नांदत आलेले दारिद्र्य गावकूस सोडायला तयारच नव्हते. तथापि दोन पावले पुढे आणि एक पाऊल मागे; कधी एक पाऊल पुढे; तर दोन पावले मागे, अशा पद्धतीने ग्रामीण भागात विकास होत होता. त्या विकासाचा फायदा कष्टकरी लोकांना होत नव्हता. सत्ता संपत्तीच्या आधारे ग्रामीण जीवनात नवश्रीमंतांचा एक वर्गही हळूहळू उदयाला येत होता. सत्तेच्या विकेंद्रीकरणामुळे सत्तेचे राजकारण गावपातळीवर जाऊन पोचले होते. साखर कारखान्यांनी ग्रामीण जीवनात काही ठिकाणी सुबत्तेची बेटे निर्माण केली. तथापि सामान्य शेतकरी, प्रामुख्याने कोरडवाहू शेतकरी, शेतमजूर आणि कष्टकरी शोषणाच्या चरकात कायमचे सापडले होते. शाळा-महाविद्यालये काढणाऱ्यांनी शिक्षणाच्या ऐवजी शोषणाचाच मार्ग स्वीकारला होता.

काळ मोठा कठीण आला, असे उद्गार या कालखंडाच्या संदर्भात काढणे योग्य ठरेल. या कालखंडात ग्रामीण भागातील ज्या नवोदित लेखकांच्या मानसिकतेवर विविध बाजूंनी आघात झाले; आणि ज्या लेखकांनी आपल्या कथा-कवितांमधून आपले अनुभव व्यक्त करण्याचा प्रयत्न केला, त्यांत गुंदेकरांच्या नावाचा आवर्जून समावेश करावा लागेल. गुंदेकरांनी ग्रामीण जीवनातल्या व्यथा-वेदना स्वतः अनुभवलेल्या होत्या. दारिद्र्याचे चटके त्यांनाही बसले होते. आपल्या विद्यार्थिदशेतच ते युक्रांदसारख्या परिवर्तनवादी संघटनांच्या प्रभावाखाली आले होते. फुले-आंबेडकरवादी विचारांचे संस्कार त्यांच्या मनावर होत होते. त्यांच्या मनात एक प्रकारची क्रांतिप्रवणता निर्माण झालेली होती. गं. बा. सरदारांसारख्या

परिवर्तनवादी विचारवंतांच्या लिखाणाचा प्रभाव त्यांच्या मनावर पडत होता. आनंद यादव आणि रा. रं. बोराडे यांच्या ग्रामीण कथा-कादंबऱ्यांमध्ये ते स्वतःचे प्रतिबिंब पाहत होते. आपलाच अनुभव या ग्रामीण लेखकांच्या लिखाणात शब्दबद्ध झाला आहे असे त्यांना वाटणे स्वाभाविक होते. गुंदेकरांना या लेखकांनी लिहिण्याची प्रेरणा दिली. भोगलेले आयुष्य, पदरी पडलेला अनुभव आणि मनाला अस्वस्थ करणारी क्रांतिप्रवणता हेच त्यांच्या कथेचे विषय बनले. हेच त्यांचे संचित होते.

गुंदेकरांनी ग्रामीण जीवनाशी असलेली त्यांची नाळ तुटू दिली नाही. ग्रामीण साहित्य, दलित साहित्य, जनवादी साहित्य अशा विविध वाङ्मयीन चळवळींच्या प्रभावाखाली ते वावरत होते. आपल्याजवळदेखील लिहिण्यासारखे खूप आहे असे त्यांना वाटणे स्वाभाविक होते. समकालीन व समविचारी कथाकारांना वाट पुसत पुसत त्यांनी आपल्या वाङ्मयीन प्रवासाला सुरुवात केली.

श्रीराम गुंदेकरांच्या 'उचल' या कथासंग्रहात एकूण अठरा कथा आहेत. 'उचल' ही त्यांतील एक महत्त्वाची कथा. तिचेच नाव त्यांनी या कथासंग्रहाला दिले आहे. 'उचल' ही कथा सखादादा नावाच्या एका वृद्ध शेतमजुराची अगतिकता उलगडून दाखविते. सखादादाने रंगातात्या नावाच्या शेतकऱ्याकडून 'आकाडात' काही पैसे उचल म्हणून घेतलेले असतात. ती उचल खर्च होते. ते पैसे फेडण्यासाठी सखादादाला रंगातात्याच्या शेतावर मजुरी करणे भागच असते. पण रोजची चूल पेटविण्यासाठी कुठून पैसे आणायचे ? यदाण्णा या नावाचा दुसरा शेतकरी सखादादाला सहा रुपये रोजाने कामाला बोलावतो. सुगीचे दिवस असतात. गावातील मोलमजुरी करणारे लोक कामाच्या शोधात गाव सोडून गेलेले असतात. यदाण्णा चार पैसे अधिक द्यायला तयार होतो. त्याचे कारण हे आहे. त्याच्या शेतावर रोजाने काम करायची इच्छा सखादादाच्या मनात निर्माण होते. त्याच्या बायकोला– राहीला– दररोज सहा रुपये मिळवून देणारे काम घालवू नये असे वाटते. ती दुसऱ्याच्या शेतावर कामासाठी गेलेली नसते. खानदानी रिवाजाला लाथ मारून परिस्थितीला सामोरे जाण्याची मानसिक तयारी तिने केलेली असते. पण रंगातात्याने सखादादाला उचल दिलेली असते. त्याचे काम सोडून यदाण्णाच्या कामावर जायचे कसे ? रंगातात्याची त्याला भीती वाटते.

सखादादा वृद्ध झालेला असतो. म्हातारपणाने त्याचे मातेरे केलेले असते. दारिद्र्याची अवकळा त्याच्या सर्वांगावर पसरलेली असते. खरे तर त्याच्या आयुष्याचा 'मसणवटा'च झालेला असतो. पण 'गेले ते दिवस' म्हणून सुस्कारा टाकण्यापलीकडे त्याच्या हाती काहीही राहिलेले नसते. बायकोवर तो रागावतो, पण परिस्थितीला तोंड देणे भाग आहे. रंगातात्या त्याला कामावर बोलवायला येतो. यदाण्णाच्या कामावर तो जाऊ शकत नाही. घरात थोडे पीठ असते. त्याच्या तीनच भाकऱ्या होतात. राही त्या बांधून सखादादाला देते. राही

स्वतःसाठी एकही भाकर ठेवून घेत नाही. सखाच्या हे लक्षात येते. एक भाकर तो बायकोसाठी ठेवतो. रंगातात्याच्या मागे मागे तो त्याच्या शेतावर जातो. रंगतात्याच्या रूपाने कर्जबाजारी हा राक्षस आपले जणू रक्तच पितोय अशी त्याची धारणा होते. सखादादाच्या अंगात संताप संचारतो. तो त्याच्या डोळ्यांतही उतरतो, पण इलाज नाही. उचल फेडणे भाग असते. ही वेठबिगारी त्याला करावीच लागते.

गुंदेकरांच्या सर्वच कथांमध्ये दारिद्र्यग्रस्त ग्रामीण जीवनातली अगतिकता आढळते. त्यांच्या कथांचे केवळ मथळे वाचूनदेखील या वस्तुस्थितीची जाणीव होईल. 'घालमेल', 'खंत', 'सुटका', 'खड्डा', 'फास', 'फिकीर' इ. मथळे फारच बोलके आहेत. गुंदेकरांच्या या कथासंग्रहातील प्रत्येक कथा ही बदलत्या ग्रामीण जीवनातील न बदलणाऱ्या शोषणाचे पापुद्रे उलगडते. 'काळ मोठा कठीण आला' हे शीर्षक प्रत्येक कथेला दिले तरी चालेल.

खेड्यापाड्यातील कोरडवाहू शेतकऱ्यांची आणि शेतमजुरांची होरपळ गुंदेकरांच्या कथांचा प्रमुख विषय आहे. त्या वाचीत असताना वाचकांच्या मनालाही त्या होरपळीचे चटके बसतात. ग्रामीण समाज हा दारिद्र्य आणि शोषणाच्या खळयात नेहमीसाठीच टाकला गेला आहे की काय असे वाटते. त्याची रास केली तरी दारिद्र्य आणि शोषणाचेच धान्य शेतकऱ्यांच्या पदरी पडते. दारिद्र्य आणि शोषणापासून बहुसंख्य ग्रामीण लोक मुक्त होऊ शकत नाहीत. त्यांनी निर्माण केलेल्या खाईपासून ते दूर पळू शकत नाहीत. त्यांनी पळण्याचा प्रयत्न केला, तरी दारिद्र्य आणि शोषण त्यांचा पाठलाग केल्याशिवाय राहणार नाहीत. ग्रामीण समाजाला परिस्थितीनेच कोलदांडा घातलेला आढळतो. मुंगसे घातलेल्या बैलासारखी त्याची अवस्था असते. तो जे पिकवतो त्याला तो तोंड लावू शकत नाही.

या कथासंग्रहातील 'उचल' या कथेशिवाय 'खेळी', 'अंधाराची विहीर', 'सोनकिडे', 'खड्डा', 'फास', 'फिकीर', 'सपाटीकरण', 'तगई', 'कोयत्यावाले' आणि 'गाडीवान' या कथा शेतकरी आणि शेतमजुरांच्या शोषणाच्या कथा आहेत. गरिबी ही ग्रामीण जीवनात खलनायिकेची भूमिका वठवीत असते. द्वेष, मत्सर, हेवेदावे, स्वार्थ, प्रथा-परंपरा, अंधश्रद्धा आणि कर्जबाजारी ह्या सर्व गोष्टी ग्रामीण जीवनाला सतत पोखरीत असतात. त्यांत आता राजकारणाची भर पडलेली आहे. ग्रामीण जीवनाला आशा-आकांक्षांचे धुमारे फुटत नाहीत. आणि फुटले तरी, ते फार काळ टिकत नाहीत. तथापि हा सर्व शाप काळजात ठेवून गावगाडा मानवी सुखदुःखाचे ओझे पेलीत पेलीत अव्याहतपणे चालतच असतो. तो थांबलेला नाही. कधी तो खोल चिखलात अडकतो तर कधी खडकावर आदळतो. त्याच्या चाकांचा खडखडाट ऐकण्याची सवय काळालाच झालेली आहे. त्याचा आवाज कर्कश असला, तरी त्याच्या चालण्यात एक प्रकारची लय असतेच. या गावगाड्याच्या चाकांवरील धावा कधी पडतात. तर कधी त्याच्या कुऱ्याच तुटून जातात. कधी कधी ती चाकेच निखळून पडतात, पण त्याचा प्रवास कधी थांबत नाही. काळाचे वार झेलीत झेलीत तो त्याच्याशी

समांतरपणे चालतच असतो. शतकानुशतकापासून तो चालत राहिला आहे.

दारिद्र्य हे पावलोपावली अगतिकतेला आमंत्रण देत असते. याचा प्रत्यय 'अंधाराची विहीर' ही कथा वाचताना येतो. या कथेतला सदाशिव चोहोबाजूंनी सपासप वार करणाऱ्या प्रसंगांना तोंड देतो. त्याचे वडील आजारी पडतात. सरकारी दवाखान्यात त्यांच्यावर समाधानकारक उपचार होत नाहीत. घरातील आहे नाही ते सर्व विकून खाजगी दवाखान्यात हलवायचा तो विचार करतो. आबाला- अर्थात सदाशिवच्या वडिलांना हे सर्व प्रयत्न निरर्थक वाटतात. सर्व काही विकून किंवा गहाण ठेवून आबाला वाचवायचा विचार तो करतो. प्रसंगी ज्यांच्यावर शेती अवलंबून आहे ते बैलही विकायची त्याची तयारी असते. परंतु गावाकडून त्याचा सालगडी एक वाईट बातमी घेऊन येतो. सदाशिवच्या बैलाची शेजाऱ्याच्या बैलाशी टक्कर लागते. ती टक्कर शेतातील विहिरीजवळ येते आणि सदाशिवचा बैल विहिरीत पडतो. ही बातमी ऐकून सदाशिवच्या डोळ्यांना अंधारी येते. एकंदर परिस्थिती त्याला अंधाराच्या विहिरीत फेकून देते.

'सोनकिडे' ही कथा भ्रष्ट नोकरशाही आणि राजकारणावरचे बोलके भाष्य आहे. 'पुढारी आणि अधिकारी ह्यांचं म्होतुर झालंय' असे नागूनाना सांगतात. अधिकारी आणि पुढारी हे विष्ठा विखुरणारे सोनकिडे आहेत असे त्यांना वाटते. सोनकिडे किमान खत तयार करण्यासाठी उपयोगी पडतात. पण हे पुढारी व अधिकारी गरीब शेतकऱ्यांच्या आयुष्याचेच खत करतात. 'ह्या पुढाऱ्याला आन अधिकाऱ्याला सोनकिडे म्हनलं तर सोनकिड्याचाच अपमान हाये.' नागूनानाचे हे शब्द खोडणे कठीणच आहे.

पुढारी आणि अधिकारी हे गरीब शेतकऱ्यांच्या अशा प्रकारे मुसक्या बांधतात, हे 'खड्डा' या कथेत गुंदेकरांनी मोठ्या खुबीने सांगितले आहे. साहेब कदम हा गरीब शेतकरी आहे. कम्युनिटी विहीर आपल्या शेतात झाली तर फायदा होईल या आशेने विहीर खोदण्यासाठी तो संमती देतो. पण अधिकारी मध्येच पैसा खातात. विहीर पूर्ण खोदली जात नाही. भला मोठा खोल खड्डा तसाच राहतो. साहेब कदम कर्ज काढतो व विहिरीचे काम पूर्ण करण्याची पराकाष्ठा करतो. पण त्या कामी त्याला यश येत नाही. तो कर्जबाजारी होतो. व्याजाचे पैसे देता देता त्याच्या नाकी नऊ येतात. अशा प्रकारे तो स्वतःच खड्ड्यात जातो. कपाळ बडविणे एवढेच त्याच्या हातात असते.

'फास' हीदेखील शेतकऱ्याच्या दारिद्र्याची कैफियत सांगणारी कथा आहे. रघुअप्पाजवळ दुःख विसरण्यासाठी एखादी मोडकी बिडीही नसते. त्याच्या समोर मेखेला बांधलेला एक बोकड असतो. रघुअप्पा त्याच्याकडे टक लावून पाहतो. मेखेभोवती आटोळे पेटोळे पडतात आणि शेवटी त्या बोकडाच्या मानेभोवती फास तयार होतो. आपली अवस्थादेखील या बोकडासारखीच आहे असे रघुअप्पाला वाटते. त्याच्या घरात मीठ-पीठ काहीच नसते. दुष्काळात बैलबारदाना सर्व काही गेलेले असते. काय करावे हे त्याला कळत

नाही. इतक्यात बोकडाचा मालक इस्माइल तिथे येतो. बोकडाच्या मानेभोवती पडलेला फास तो काढतो. सिरपती जोगदंड नावाचा एक शेतकरीही तिथे येतो. रघुअप्पाचे शेत पेरून देण्याचे तो आश्वासन देतो. त्याच्या मानेभोवती पडलेला परिस्थितीचा फास अशा प्रकारे निघतो. पण उद्या आपल्या नशिबी काय आहे याचा तो विचार करतो. तो बोकड कदाचित कापला जाईल. आपले काय होणार?

'फिकीर' ही कथाही याच विषयाला हात घालते. भयानक दुष्काळ पडलेला असतो. पाऊस नाही आणि म्हणून पेरणीही नाही. 'इथं खायालासुद्धा पैसा नाही' अशी शेतकऱ्यांची अवस्था असते. गरीब शेतकरी कुटुंबात जन्मलेल्या एका कनिष्ठ अभियंत्याची घालमेल या कथेत आहे. तो असतो एका गरीब शेतकरी कुटुंबातला. पण अभियंता झाल्यामुळे सुखवस्तू जीवन तो जगतो. गावाकडे त्याचे वडील, आई व भाऊ मात्र दारिद्र्याच्या चक्रात सापडलेले असतात. दुष्काळाने त्यांच्या दुःखावर मीठ चोळलेले असते. या अभियंत्याच्या बायकोला मात्र त्यांच्या या दुःखदायी परिस्थितीची जाणीव नसते. गावाकडील लोकांच्या भावना ती समजू शकत नाही. ती आत्मकेंद्रित जीवन जगते व जगू इच्छिते. नवऱ्याच्या मनात मात्र अपराधाची भावना असते. गावाकडून त्याला पत्र आलेले असते. त्याची चिंता गावाकडील लोकांना असते. तो गावी जातो. आई, वडील, भाऊ हे सर्व कुटुंबीय दुःखात सापडलेले असतात. आपल्या या मुलाची मात्र आईवडिलांना फिकीर असते. मनाला चटका लावणारी ही कथा आहे.

'सपाटीकरण' या कथेतही दारिद्र्याचे भीषण अंतरंग उलगडून दाखविलेले आहे. ही कथा आहे मुख्यत्वे मंदा आणि तिच्या नवऱ्याची. मंदाचा नवरा रावन हा फारसे काम करीत नाही. घरी पिठाची गाठ मिठाशी पडत नाही. रोजची चूल पेटणे कठीण झालेले असते. मंदा मात्र घरी आणि शेतात राबते. रोजंदारीने ती कामाला जाते. सपाटीकरणाच्या कामाला ती जाते. नवराही जातो. पण मुकादम सर्व मजुरांची पिळवणूक करतो. खोट्या हजेऱ्या लावून पैसे मारतो. कामाचे पैसे तो वळेवर देत नाही.

पिण्याचे पाणीदेखील मिळणे कठीण. त्यासाठी वणवण फिरावे लागते. मंदाला खूप त्रास होतो. पाण्याच्याऐवजी तिला आपले मरणच शेंदावे लागते. जमिनीचे सपाटीकरण म्हणजे पोटाचे सपाटीकरण. मंदा व तिचा नवरा रावन यांना खूप त्रास सहन करावा लागतो. मुकादमाच्या विरुद्ध ते आवाज उठवू शकत नाहीत. पण एक बंडखोर तरुण पुढे येतो. सपाटीकरणाचे काम करणाऱ्या मजुरांची एकजूट तो करतो. मुकादम वठणीवर येतो. सर्व मजुरांचे तो पैसे देतो.

कर्जबाजारी होणे हे ग्रामीण जीवनात अटळ होऊन बसले आहे. शासनाच्या ज्या काही योजना असतात त्या शेतकऱ्यांपर्यंत पोहोचत नाहीत. 'तगाई' या कथेत गुंदेकरांनी हाच प्रश्न हाताळला आहे. संतुबाची ससेहोलपट या कथेत चित्रित केली गेली आहे. त्याला तगाई










मंजूर झालेली असते. ती सरपंच आणि तलाठ्याच्या प्रयत्नाने त्याला मंजूर होते. पण ती त्यांच्या चहापाण्यावरच खर्च होते. सरपंच आणि तलाठ्याला संतुबा तालुक्याच्या ठिकाणी घेऊन जातो. प्रवास खर्च, चहापाणी आणि बिडीकाडीवर त्याला बराच खर्च करावा लागतो. शेवटी त्याच्या हातात केवळ पंधरा रुपये शिल्लक राहतात. तगाई वाटप करणाऱ्या सरकारला पुढच्या निवडणुकीत इंगा दाखवण्याची भाषा संतुबा करतो.

'कोयत्यावाले' आणि 'गाडीवान' या कथांमध्ये साखर कारखान्यावर मजुरी करणाऱ्या शेतमजुरांची दुरवस्था दाखविलेली आहे. कोयत्यावाला आपली बायको व मुले घेऊन कारखान्यावर जातो. तो आपल्या बायको व मुलांसहित झोपडीत राहतो. पण एके दिवशी झोपडीला आग लागते. ती जळून जाते व संसाराची राखरांगोळी होते. घराचा मसनवटाच होतो. साखर कारखाना मात्र डौलात उभा असतो. कामगारांच्या कामावर तो चाललेला असतो. याची जाणीव कोयत्यावाल्याला असते. पण करणार काय ? तो अगतिक असतो. परिस्थिती त्याला व त्याच्या बायकोला दैववादी बनविण्याचा प्रयत्न करते.

'गाडीवान' या कथेतला बळी जाधव हाही परिस्थितीला बळी जातो. आपली बैलगाडी घेऊन साखर कारखान्यावर तो ऊसतोडणीसाठी जातो. तिथे त्याला उचल घ्यावी लागते. बायको व मुलगा बरोबर घेऊन तो आपले गाव सोडून कारखान्यावर आलेला असतो. त्याच्या खांद्यावरील उसाच्या मोळ्या ह्या जणू दुःखाच्याच मोळ्या असतात. कारखान्यावरचा मुकादम हिशेब बरोबर ठेवीत नाही. बळी जाधवला तो फसवतो. त्याला तो व्याजाच्या चरकात ढकलतो. परमुलखात बळी जाधव हतबल होतो. वेठबिगार म्हणून त्याला तिथे जगावे लागते. चार पैसे कमवून गावी परतायचे त्याचे स्वप्न विरून जाते.

गुंदेकरांच्या काही कथांमधून ग्रामीण जीवनातील राजकारणाचे कुरूप दर्शनही घडते. ते किती खालची पातळी गाठू शकते याचा प्रत्यय 'खेळी' ही कथा वाचल्यानंतर येतो. या कथासंग्रहातील ही प्रदीर्घ कथा आहे. दादाराव जाधव हा पुरोगामी विचारांचा सुशिक्षित तरुण आपल्या शेतीचा विकास करू इच्छितो. पुरोगामी विचारांनी व चळवळींनी त्याची मानसिकता घडविलेली असते. फुले, शाहू आणि आंबेडकरांच्या विचारांचा पगडा त्याच्या मनावर असतो. नाना पाटलांची भाषणे त्याने ऐकलेली असतात. कर्ज काढून तो विहीर पाडतो. ऊस लावतो. पण ज्या साखर कारखान्याचा तो सभासद असतो तो त्याचा ऊस वेळेवर घेत नाही. आणि म्हणून तो दुसऱ्या कारखान्याला आपला ऊस देतो. पण कायद्याप्रमाणे दुसऱ्या कारखान्याला ऊस देता येत नाही. त्याच्याविरुद्ध कोर्टात खटला भरला जातो. पुढे उच्च न्यायालयात तो जातो व त्याला नुकसानभरपाई मिळते. शेतकऱ्यांना संघटित करून तो अन्यायाच्या विरुद्ध लढतो. कारखान्याचे अध्यक्ष देशमुख व कार्यकारी संचालक देशपांडे हे दादाराव जाधव याच्या मेहुण्याला हाताशी धरून कारस्थान रचतात. दादाराव जाधवची बहीण ही रामराव जगतापला दिलेली असते. तिची साडी पेटल्यामुळे ती

भाजली जाते. वस्तुतः हा डाव रामरावाला हाताशी धरून देशमुख व देशपांडे यांनी रचलेला असतो.

श्रीराम गुंदेकरांच्या काही कथांमधून ग्रामीण जीवनातील नातेसंबंधातील गुंतागुंत आणि ताणतणाव हळुवारपणे व्यक्त झालेले आहेत. त्यात स्वार्थ, नागवणूक, द्वेष, मत्सर, प्रेम आणि जिव्हाळा यांचे दर्शन होते. 'साठवण' या कथेत हरणामायची ससेहोलपट कशी होते याचा आलेख आढळतो. तिचे सर्व आधार तुटत जातात. नवऱ्याने दुसरी बायको केलेली असते. कारण हरणामायला मुलगा होत नाही. नवरा सवतीच्या तालावर चालतो. हरणामायला फसवून तो कागदपत्रावर तिचा अंगठा घेतो. मालमत्तेत तिला वाटा मिळत नाही. दररोज मारहाण. हरणामाय हताश होते. शेजारीपाजारी फारशी मदत करू शकत नाहीत. दुःखाचे ओझे वागविणारी हरणामाय शेवटी आगगाडीखाली जीव देते. मागे राहते फक्त तिच्या यातनांची साठवण.

'घालमेल' ही कथा सकूच्या मानसिक अवस्थेची गुंतागुंत अतिशय तरलतेने टिपते. तिचा नवरा आजारी असतो. बाप मृत्युशय्येवर शेवटच्या घटिका मोजत असतो. बापाला कुणाचाच आधार नसतो. लोक त्याला आधार देऊ शकत नाहीत. सकूच्या नवऱ्याचा स्वभाव तुटक असतो. सकूची इच्छा असूनही ती बापाकडे जाऊ शकत नाही. बापाचे गाव फार दूर नसते. बाप खूप आजारी असल्यामुळे सकूचा नवरा तिला बापाकडे जायला परवानगी देतो. पण सकाळी जाऊन लगेच सायंकाळपर्यंत ती परत आली पाहिजे. शकुंतला आपल्या मुलाला बरोबर घेऊन बैलगाडीने बापाला भेटायला जाते. बापाची अवस्था तिला बघवत नाही. गळयात हुंदके साठवून ती परत येते. नवरा खूप आजारी असल्याचे ती सांगते. एकीकडे आड व दुसरीकडे बारव अशी तिची अवस्था होते. बाप हताश असतो. सकूही हताश असते. 'पोरी, मी मेल्यावर तरी माझ्या मड्याला वारा घालाया तरी येचील का न्हायी ?' असा प्रश्न तो लेकीला विचारतो. सकूजवळ या प्रश्नाचे उत्तर नसते. तिची घालमेल वाचकाच्या मनाला चटका लावून जाते.

'ओवाळणी' या कथेचा आरंभ बहीण-भावाच्या अनुबंधातून होतो. भास्कर सकपाळची आई आपल्या भावाला– आप्पासाहेब पवारला– ओवाळणी म्हणून मुलाला नोकरी मिळवून देण्याचा आग्रह धरते. आप्पासाहेब पवार ही वतनदार आसामी असते. राजकारणावर गबर झालेला हा माणूस आहे. तो आपल्या भाच्याला शिक्षकाची नोकरी मिळवून देतो. बहिणीला अर्थातच आनंद होतो, पण भास्करचा भ्रमनिरास होतो. पगारपत्रकावर त्याला सह्या कराव्या लागतात. पगार मात्र मिळत नाही. त्याच्या नेमणुकीला मान्यता मिळाली नाही असे त्याला हेडमास्तर सांगतो. चळवळीत वाढलेल्या भास्करला या सर्व गोष्टींचा संताप येतो. परिस्थितीशी त्याला जुळवून घेता येत नाही. वर्गात विद्यार्थी नसतात, पण हजेरीपटावर ते दाखविले जातात. पगाराच्या नावावर आलेले पैसे संस्था

चालकाच्या खिशात जातात. शोषणाचे हे 'शिक्षित' रूप भास्करला अस्वस्थ करते. आणि आश्चर्य म्हणजे न दिलेला त्याचा राजीनामा मंजूर केला जातो.

'कळप' या कथेचा विषयही नातेसंबंधातील गुंतागुंत आणि शोषण हाच आहे. मंजुळा ही एक प्रगतिशील विचाराची तरुणी असते. एका सुशिक्षित तरुणाशी तिचा विवाह झालेला असतो. अभिमान वाटेल असेच सासर तिला मिळालेले असते. तिच्या भावाचे वागणे कौतुक करण्यासारखेच असते. सासर आणि माहेर या दोन्हींचाही तिला अभिमान वाटतो. पण सासू तिच्या आनंदात विष कालवते. ती असते खाष्ट. ती आपल्या मुलाचे– आनंदरावाचे– मन कलुषित करायचा प्रयत्न करते, पण तो तिला बळी पडत नाही. आपली बायको जाचात सापडली आहे याची त्याला जाणीव असते. पण आईच्या अशा ह्या वागण्यास तो आवर घालू शकत नाही. मंजुळा स्वाभिमानी आहे. बापाकडे ती जाऊ इच्छित नाही. वेगळे राहण्याची हिम्मत नवऱ्याजवळ नसते. जाच वाढतच जातो. अशा यातनामय आयुष्याच्या प्रश्नाचे उत्तर मरणच असू शकते असे तिला वाटते. ती आपल्या जीवाचे बरेवाईट करून घेते. माहेरच्या कळपातून ती सासरच्या कळपात आलेली असते. पहिल्या कळपात तिला राहता येत नाही; दुसरा कळप तिला पूर्णतः स्वीकारत नाही.

'उचल' या कथासंग्रहातील दोन कथांमध्ये गूढात्मकता आहे. 'नातू' आणि 'खंत' ह्या त्या कथा होत. या कथांमध्ये वापरलेली प्रतीके अद्‌भुतता वाढवितात. 'नातू' ही ठका म्हातारीची कथा आहे. शंकर हा तिचा मुलगा. शंकरला मुलगा होतो. मुलाच्या जन्मानंतर शंकर वारतो. शंकर जन्मला होता तेव्हाही असेच झाले होते. शंकरच्या जन्मानंतर त्याचा बाप मेला होता. ठका म्हातारीची सून अर्थात शंकरची बायको माहेरी बाळंत होते. बाळंत होण्यापूर्वी म्हातारीची उत्सुकता शिगेला पोचलेली असते. आपल्याला नातू व्हावा ही तिची कामना ! ती पूर्ण होते. तो शंकरसारखाच असेल का ? शंकर जन्मला तेव्हा त्याचा बाप वारला होता. आताही तसेच होईल का ? नातू पाहण्यापूर्वीच तिला पान्हा फुटतो. तिला तंद्री लागते. सुखदुःखात पडलेले ते स्वप्न असते !

'खंत' ही कथाही एक प्रकारची 'फॅन्टसी' आहे. कला नावाच्या एका तरुण स्त्रीची ती कथा आहे. तिचे घर गावकुसाबाहेर असते. रात्रीची वेळ. घरी कला एकटीच असते. पोटातला अंकुर वाढलेला असतो. काही महिन्यांनी जन्मणाऱ्या मुलाची कल्पना करीत करीतच तिला पान्हा फुटतो. तिच्या सर्वांगावर रोमांच उभे राहतात. ती अंथरुणावर पडलेली असते. दारावर कुणीतरी थाप मारलेली तिला ऐकू येते. ती घाबरते. मागे असेच एकदा झाले होते. चार-पाच जणांनी तिची अब्रू लुटली होती. हा तसाच तर प्रकार नाही ना ? ती दार उघडते. तिचा तो नवरा असतो. स्वप्न आणि दुःस्वप्नाच्या मिठीत सापडलेले वास्तव गुंदेकरांनी या कथेत चित्रित केलेले आहे.

श्रीराम गुंदेकरांच्या कथांमध्ये स्थित्यन्तरांच्या कचाट्यात सापडलेल्या आजच्या

ग्रामीण जीवनाचे दर्शन घडते. दारिद्र्य, शोषण आणि दुःख यांचे आदिम आणि शाश्वत दर्शन घडविणाऱ्या या कथा आहेत. ग्रामीण जीवन बदलत असले तरी दारिद्र्य, शोषण आणि दुःख हे तीन घटक कायमस्वरूपी तिथे ठाण मांडून बसलेले आढळतात. बहुसंख्य लोकांना काबाडकष्ट केल्याशिवाय गत्यंतर नाही. त्यांच्या पदरात फारसे काही पडत नाही. गुंदेकरांच्या कथांमधील पात्रे ही एक प्रकारच्या होरपळीमध्ये सापडलेली आहेत. अनेकांच्या वाट्याला यातनाच आलेल्या आहेत. पर्वताएवढे दुःख पाठीवर घेऊन ती जगत असतात. अगतिकता पदोपदी त्यांना अडवण्याचा प्रयत्न करते. तथापि ती परिस्थितीला शरण जात नाहीत. त्यांना आत्मभान आहे. स्वाभिमानही आहे. लाचारी ती स्वीकारीत नाहीत. प्रसंगी परिस्थितीच्या विरुद्ध ती आपला निषेध नोंदवीत संघर्षही करतात.

गुंदेकरांच्या कथेचे दुसरे वैशिष्ट्य असे की, ती पात्रांच्या संवादांतून विकसित होत जाते. कथाकार फारसे भाष्य करीत नाही. निवेदने फारशी नसतात. पण जिथे कुठे ती असतात तीही अस्सल ग्रामीण भाषेत असतात. निवेदन किंवा भाष्य करण्यासाठी गुंदेकर प्रमाणभाषेचा उपयोग करीत नाहीत. ते प्रमाणभाषेचा आधार घेत नाहीत. त्यांनी आपल्या सर्व कथा अस्सल ग्रामीण बोलीत लिहिलेल्या आहेत. चुकूनही प्रमाणभाषेचे संस्कार त्यांनी आपल्या ग्रामीण बोलीवर होऊ दिले नाहीत.

(उचल : श्रीराम गुंदेकर, प्रतिमा प्रकाशन, पुणे ३०; मूल्य ६० रुपये.)
(आविष्कार, श्रमसाफल्यनगर, लातूर ४१३५३१.)

---

प्रा. भगवान ठाकूर

# अंतर्मुख करणारा नाट्याविष्कार

प्रा. रतनलाल सोनग्रा यांच्या 'क्रांतिबा फुले' या मूळ हिंदी नाटकाचा सुप्रसिद्ध कवी प्रा. फ. मु. शिंदे यांनी केलेला अनुवाद म्हणजे 'क्रांतिबा फुले' हे पुस्तक.

एक स्वतंत्र, स्वयंपूर्ण नाट्याकृती वाटावी इतका सरस अनुवाद साधणे अवघड. त्यातही महामानवांच्या जीवनावर कलाकृती तयार करणे फारच अवघड. प्रा. सोनग्रा यांच्या हिंदी नाट्यसंहितेला खास मराठमोळा बाज देऊन एक प्रभावी नाट्यानुवाद फ. मु. शिंदे यांनी साधला आहे.

तीन अंकांत कथानकाची सूत्रबद्ध मांडणी केलेले अवघ्या ६७ पृष्ठांचे हे नाटक. अल्पाक्षर, बहुअर्थप्रसव अशा लहान लहान परंतु विलक्षण नाट्यमय दृश्यांनी युक्त असे हे



अनुक्रमणिका






नाटक. पहिल्या व दुसऱ्या अंकात प्रत्येकी नऊ आणि तिसऱ्या अंकात १३ दृश्ये. अशा एकूण ३१ दृश्यांत नाट्यवस्तूची रचना.

वस्तुतः महात्मा फुले यांचे कार्य आणि कर्तृत्व आकाशाला गवसणी घालणारे लोकोत्तर. नश्वर शब्दांच्या चिमटीत हे अक्षरकर्तृत्व सामावूच शकत नाही. पण सोनग्रा यांनी कौशल्याने म. फुले यांच्या जीवनातील जे सर्वांत अधिक नाट्यपूर्ण, ठळक व ऐतिहासिक घटना-प्रसंग आहेत तेवढे अलगद वेचून आपल्या चित्रमयी शैलीत शब्दांकित केले आणि त्यांना तितक्याच काव्यमय पद्धतीने फ. मु. शिंदे यांनी साक्षात केले. ही नाट्यकृती वाचताना काळीजतळापासून वाचक अस्वस्थ होतो. झपाटतो आणि अंतर्मुख होऊन नाट्यनायकापुढे नतमस्तक होतो.

आयुष्यभर 'सत्यासत्याशी मन केले ग्वाही मानियले नाही बहुमता' या निर्धाराने आणि 'याल तर तुमच्यासह, नाहीतर तुमच्याखेरीज' या जिद्दीने म. फुले यांनी क्रांतिज्योती सावित्रीबाईसह ज्या कुप्रथांशी झुंज दिली त्या महान सत्यधर्मीयांच्या बुलंद आत्मविश्वासाचा साक्षात्कार हे नाटक वाचताना होतो. अस्पृश्य मुला-मुलींसाठी काढलेली शाळा, स्त्रीशूद्रांना शिक्षणाची उपलब्ध करून दिलेली सोय व संधी, त्यासाठी वडिलांचे सोडावे लागलेले घर, सनातन्यांनी दुष्ट बुद्धीने फुले यांच्यावर घातलेले मारेकरी, नारायणराव लोखंडेंच्या सहकार्याने सुरू केलेली कामगार चळवळ, बालविधवांचे केशवपन होऊ नये म्हणून घडवून आणलेला न्हाव्यांचा अभूतपूर्व संप, ब्रिटनच्या राजपुत्राच्या स्वागतसमारंभात त्यास घडविलेले भारतीय जनजीवनाचे वास्तव दर्शन, आंतरजातीय विवाहास दिलेली चालना, स्वामी दयानंद सरस्वतींच्या मिरवणुकीस दिलेले संरक्षण, अनाथ बालकांसाठी अनाथगृह व उच्चजातीय विधवा पण नाडल्या गेलेल्या स्त्रियांसाठी प्रसूतिगृह अशा निवडक परंतु महात्मा फुले यांचे 'महात्मापण', क्रांतिकारी कार्य सिद्ध करणाऱ्या घटनांची निवड फार चोखंदळपणे लेखकाने केली आहे. लेखकाची चोखंदळ दृष्टी या नाटकाच्या शीर्षकापासूनच दिसते.

प्रारंभीच फ. मु. शिंदे यांची ज़ोतिबांवरील 'ज्योति-कलश' या शीर्षकाची कविता आहे. ही कविता जणू ह्या नाटकाचे पताकास्थानच आहे,

*कहाणी कंठात होती*
*कुणब्यांच्या कष्टांची*
*दृष्टीत चीड होती*
*छळणाऱ्या दुष्टांची*
*तू म्हणाला हे कसे की भोगणारे भोगती ?*
*हृदयात लाख तुझ्या अजूनी ज्योती जागती !*

अशी ज्योत जागवण्याचे कार्य 'क्रांतिबा फुले' सारखे नाटक करू शकेल, असा










दिलासा ही नाट्यकृती वाचताना मिळतो.

पुस्तकाच्या मनोगतातच आलेले, 'आम्ही गुलाम होतो म्हणून अधःपतित झालो नाही, तर अधःपतित होतो म्हणून गुलाम झालो.' हे विचारसूत्रच या नाटकाचे सूत्र आहे. (पृ ९).

आज फुले-आंबेडकरांना देव बनवून, अवतार बनवून संपवू पाहणाऱ्या मूलतत्त्ववाद्यांच्या कारवाया वाढत आहेत. 'जे कार्य विरोधातून होत नाही ते पूजा करून साधता येते' हा प्रतिगामी शक्तींचा होरा आहे. दुसरीकडे क्रांतिकारकांच्या जीवनाचे खऱ्या अर्थाने अनुसरण न करणारे निष्ठाशून्य अनुयायी भूछत्रासारखे उगवत आहेत. क्रांतिकारकांच्या निष्ठाशून्य अनुयायांपेक्षा अधिक प्रभावी शत्रू दुसरे सापडणार नाहीत.

अशा स्थितीत 'क्रांतिबा फुले' सारखी नाट्यकृती संबंधितांच्या डोळ्यांत झणझणीत अंजन घालण्यास उपयोगी पडू शकेल. दैहिक आणि ऐहिक गुलामगिरी घालवता येते, पण मानसिक गुलामगिरी घालवणे दुरापास्त. ती शस्त्राने मुळीच घालवता येत नाही, शास्त्रानेच घालवावी लागते याचा खरा साक्षात्कार झालेल्या फुले यांनी म्हणून प्रथम शिक्षणाची क्रांती घडविली. अज्ञान-अडाणीपण हेच सर्व मानवी दुःखाचे मूळ.

'विद्येविना मती गेली. . . .' हे विचारसूत्र घेऊन फुले यांनी स्त्रीशूद्रातिशूद्रांना शिक्षणाची प्रेरणा दिली, याचं सुंदर चित्रण या नाटकाच्या पहिल्या अंकात आहे.

विधवांची दुःस्थिती, चातुर्वर्ण व्यवस्था ही ईश्वरनिर्मित नसून मनुष्यनिर्मित आहे, ही विषमताच ऐक्याच्या आड येणारी आहे; हा विचार दुसऱ्या अंकाच्या पूर्वार्धात सांगितला आहे.

*जोतीस जोत जोडि लाविना, एका होईना, सर्व जगांत ।*
*फुले रावाचे निके बोल, नव्हती फोल, आणा ध्यानांत ॥४॥ (पृ. ३६)*

या गीतातून दुहीचे बीज स्पष्ट होते. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांच्या शवाचे फुले यांनी केलेलें रक्षण इ. प्रसंग लक्षवेधक आहेत.

तिसरा अंक हा १३ दृश्यांचा आहे. त्यांत लोखंडे यांनी जोतीरावांच्या प्रेरणेने सुरू केलेली कामगारांची चळवळ, दुष्काळात गरिबांना केलेली मदत, टिळक-आगरकरांचा फुले यांनी घडवून आणलेला सत्कार, इंग्लंडच्या राजपुत्राच्या सत्कार समारंभात भारतीय जनजीवनाचे फुले यांनी घडविलेले दर्शन, विधवा केशवपनबंदी इ. जोतिबांच्या कार्याचे संक्षेपाने पण, साक्षेपाने ठसठशीत दर्शन घडविले आहे. एखाद्या गतिमान चित्रपटात जशा एकापाठोपाठ नाट्यपूर्ण घटना घडत जातात, कथानक प्रेक्षकांपुढे साक्षात होते तशीच या नाटकाची संवादशैली आहे.

या नाटकाच्या प्रायोगिक मूल्याच्या दृष्टीने पाहता पात्रांची विपुलता ही गोष्ट थोडी अडचणीची वाटते. जवळपास प्रत्येक दृश्यात वेगळी पात्रे आहेत. जोतीबा, सावित्रीबाई, फातिमा, गोविंदराव, दीक्षित, शास्त्री, मुनीमजी, हरिभाऊ, कृष्णभट्ट, मातंग रोडे, धोंडिराम,

मोरेश्वर, जगन्नाथ कुणबी, लोखंडे अशी कितीतरी पात्रे यात आहेत. हे नाट्याविष्काराच्या दृष्टीने थोडे अडचणीचे आहे.

या नाटकाची भाषा, त्यात आशयानुसार वापरलेली शब्दकळा विशेष लक्षणीय आहे. फ. मु. शिंदे यांनी काही शब्द तर खास तयार केल्याचे वाटतात. उदा. कलमकसाई, सर्वांगिनी (पत्नी) ब्रह्मकपट, नरकपालिका इ. मूळातला आशय अधिक प्रभावी आणि प्रवाही व्हावा म्हणून योजलेल्या म्हणी, वाक्यप्रयोग उदा. शहामृगासारखे वाळूत तोंड खुपसून बसणे, अक्कल असून अधू, गंगा आली घरी आणि आपण झोपेच्या दारी इत्यादी. सत्यशोधक जलशाच्या निमित्ताने सूत्रधार-सभाध्यक्ष, स्वागतकार या रूपाने आणला आहे. घटना-प्रसंगांतील काव्यनाट्य आविष्कृत करण्यासाठी मधून मधून गाणी, कविता, सुभाषितवजा रचना यांचाही यथोचित वापर केला आहे. नाट्यसंहितेच्या शेवटी मुद्दाम परिशिष्ट देऊन त्यात सोनग्रा यांच्या मूळ हिंदी नाटकावरील काही निवडक अभिप्राय दिले आहेत. ते अतिशय बोलके आहेत. त्या अभिप्रायांच्याच शब्दांत सांगायचे, तर साहित्य मन घडविते. मने घडली की समाज व राष्ट्र घडते. समाजप्रबोधन आणि परिवर्तनाचे कालसुसंगत संस्कार नव्या पिढीवर व्हायचे असतील, तर कलात्मकतेची उंची राखून समाजसुधारक, महात्मे, क्रांतिकारकांच्या जीवनाचे यथार्थदर्शन कथा, कविता, कादंबरी व विशेषतः नाटक-चित्रपटांच्या माध्यमातून झाले पाहिजे. विश्राम बेडेकरांचे 'टिळक आणि आगरकर' हे नाटक या दृष्टीने जसे मोलाचे आहे तसेच 'क्रांतिबा फुले' ह्या नाटकाचे वाचक स्वागत करतील असे वाटते. रसपरिपोषाचा काही दृश्यांत अभाव, नाट्यसंघर्षाची तीव्रता कमी यासारखे दोष अनुवादक फ. मु. शिंदे यांचा नाट्यलेखानातील नवखेपणा लक्षात आणून देतो. तथापि त्यांच्याच भाषेत सांगायचे, तर 'उद्रेकास ज्वालामुखी तुझीच मुखे मागती' याप्रमाणे शिंदे यांची व सोनग्रा यांची समाजक्रांतीची इच्छाच यातून व्यक्त होते, ही गोष्ट अधिक मोलाची वाटते.

(क्रांतिबा फुले (चित्रनाट्य कथा) रतनलाल सोनग्रा, मराठी अनुवाद फ. मु. शिंदे, प्रबुद्ध नायक शिक्षण विकास प्रतिष्ठान प्रकाशन, मुंबई ४०००८३, पृष्ठ ७५, किंमत ५० रुपये.)

(१५ ब, आविष्कार, विठ्ठलनाथ, धुळे.)



अनुक्रमणिका







## समीक्षा-लेखांचा लक्षणीय संग्रह

गुलबर्गा येथील मराठीचे प्राध्यापक प्रा. व्यंकटेश वळसंगकर साहित्यक्षेत्रातील अनेकांच्या चांगले परिचयाचे आहेत. यापूर्वी त्यांचे दोन काव्यसंग्रहही प्रसिद्ध झाले आहेत. आता ते 'शब्दसंगत'च्या निमित्ताने समीक्षक या नात्यानेही आपल्यासमोर येत आहेत. 'शब्दसंगत' हा पंधरा समीक्षात्मक लेखांचा एक छोटेखानी संग्रह आहे. याला डॉ. यू. म. पठाण यांची प्रस्तावना लाभली आहे.

आजच्या मराठी साहित्यसमीक्षेचे स्वरूप अनेक केंद्री बनले आहे. त्यांतील एक महत्त्वाचे केंद्र म्हणजे वृत्तपत्रांतून-साप्ताहिकांतून प्रकट होणारी समीक्षा. नवग्रंथपरिचय, त्याचा धावता परिचय-परामर्श, हेच या समीक्षेचे प्रधान विशेष. सखोल चर्चाचिकित्सेला, गुणदोषमीमांसेला येथे अवसर नसतो. जे काही सांगावयाचे ते स्वल्पातच सांगावे लागते, 'शब्दसंगत' मधील बहुतेक लेखन या विशिष्ट पर्यावरणात झालेले असल्यामुळे या झटपट वृत्तीची छाया 'शब्दसंगत' वरही पडलेली आहे. कारण यातील बहुतेक लेख वृत्तपत्रांतून प्रसिद्ध झाले आहेत.त्या कक्षेतच वावरणारे आहेत.

प्रस्तुत पुस्तिकेत लेखनविषयक बनलेली बहुतेक पुस्तके काव्य किंवा कवितासंबद्ध अशी आहेत. प्रा. वळसंगकर हे स्वतः कवी असल्यामुळे समकालीन मराठी कविता हा त्यांचा खास चिंतन-मननाचा, विचाराचा विषय बनावा हे साहजिकच आहे. यातील 'आजची कविता वाचकांपासून दूर जात आहे ?', 'दलितकाव्य- एक समजलेला अर्थ', 'गंधवती' तील गंधकविता, 'सौंदर्य प्रीतीने नटलेला 'धुंद किनारा' 'सहा काव्यसंग्रह : एक परामर्श', 'आत्मलक्षी तशीच समाजलक्षी कविता : 'आत्मधून', 'वास्तववादी कविता जगणं माणसाचं' यासारखे या संग्रहातील लेख याचेच द्योतक आहेत. यातून वळसंगकरांची जी निर्व्याज, विविध प्रकारच्या काव्यनिर्मितीवर प्रेम करणारी रसिक वृत्ती जाणवते, ती आनंद देणारी आहे. वळसंगकरांचा भर दोषदर्शनांपेक्षा गुणवर्णनावर आहे. ही वस्तुस्थिती, आजच्या वाङ्मयक्षेत्रातील हेव्या-दाव्यांच्या पार्श्वभूमीवर विशेषच उठून दिसते. वळसंगकरांना नव्या कवितेबद्दल आस्था असली तरी त्यांना जुन्या कवितेचे वावडे नाही, याची प्रचीती 'रामात्मज कृतपदे, स्तोत्र, व आरती' सारखा यातील एखादा दुसरा लेख देतो. कवितेप्रमाणेच काव्येतर क्षेत्रेही त्यांना जवळची वाटतात. हे 'अनुबंध' ची दहा वर्षे' यातील लेखावरून स्पष्ट होते.



अनुक्रमणिका

'अनुबंध' या नियतकालिकाने महाराष्ट्राबाहेर राहूनही जी मराठी भाषावाङ्मयाची सेवा चालविली आहे,तिचे यथोचित आकलन होण्याच्या दृष्टीने हा लेख विशेष महत्त्वाचा आहे.

याच प्रकारचे यात आणखी एक-दोन लेख आहेत. 'एक रोमहर्षक इतिहास : हैद्राबाद स्वातंत्र्यसंग्रामाच्या आठवणी' (लेख क्रमांक ८) या लेखात निजामी राजवटीत निजामाच्या जुलमी सत्तेविरुद्ध व या सत्तेने भारतीय इतिहास-संस्कृती-भाषा यांची जी पायमल्ली चालविली होती, आणि ती नष्ट होण्याच्या दृष्टीने तेथील जनतेने जो निकराचा यशस्वी लढा दिला तिचा परिचय प्रेरणादायक वाटतो. महाराष्ट्रातील बहुसंख्य वाचकांना याचा फारसा परिचय नसतो यामुळे या लढ्यावर आधारलेल्या पुस्तकाचे वळसंगकृत परीक्षण स्वागतार्ह ठरते.

समीक्षेच्या दालनात वळसंगकर नव्यानेच प्रविष्ट होत आहेत. त्यांनी या क्षेत्रात अधिक जिद्दीने, चिकाटीने व समीक्षेची व्यापक क्षेत्रे समोर ठेवून कार्योन्मुख व्हावे, असे शुभेच्छापूर्वक सुचवावेसे वाटते.

(शब्दसंगत : व्यंकटेश वळसंगकर, मराठी साहित्य मंडळ, गुलबर्गा, पृष्ठे ७४, मूल्य ३० रुपये.)

(कलानगर, धनकवडी पुणे ४११०२३.)

---

**डॉ. शंतनू वसंत चिंधडे**

## वास्तवाचे अनोखे भान

अशोक नायगावकर या ताज्या दमाच्या कवीचा हा पहिलाच काव्यसंग्रह. 'आपण तेच ते लोक असतो' या पहिल्याच कवितेत एक हलकासा सामाजिक धक्का कवी देऊन जातो व पुढील पानांतून एकंदरीत काय वाढून ठेवले आहे याचा आपल्याला अंदाज येऊ लागतो. या कवितेत कवी म्हणतो,

*कुठल्या अस्वस्थ लाखमोलाच्या*
*जीवानं का आत्महत्या केली*
*हे जसं वाटतं–*
*तसं कितीतरी लोकांनी*
*आत्महत्या का केली नाही*
*असंही वाटत राहतं. . . !*
*आपण सर्वच एका असंबद्ध देशातून वावरतो. . .*

कवीच्या बावतीत आयुष्य म्हणजे विलंवित सुरांची एक मैफल चाललेली असते.

आयुष्यातल्या असहाय्यतेला उतारा म्हणून कवितेचा आधारही दुबळा ठरतो. कारण कवी कवितेला लपवतो. आतल्या आत डोळे कोरडे करतो. पूर्व युरोपातले कवी, लेखक, नाटककार तो मनातून नुसते पाहतो. व हे एखाद्या प्रसंगाचे चित्रीकरण तर नाही ना, असे म्हणून वाटेवरून पुढे सरकतो. अनेक गोष्टींची उगाचच काळजी करतो, पण अखेरीस कविताच खराखुरा आधार ठरते व दुसरे काही न करता कवी कविता लिहीत राहतो. कवितेवरचे हे निस्सीम प्रेम पानापानांतून भेटत राहते.

कवीच्या भोवती असलेला निसर्ग कसा? तर सल्फरचा सर्वत्र पसरलेला गंध, माथ्यावरचे काळपट ढग, गच्च झोपड्यांच्या खोबणीतला मख्ख डांबरी रस्ता, पेट्रोलचा खमंग वास चाखत समुद्रात जिथे ड्रेनेजचे तोंड उघडते तेथल्या दलदलीत औदुंबर वृक्षाचे अस्तित्व (औदुंबर) कवीला जाणवलेला जीवनातला दारुण विरोधाभास. पूर्वसूरींच्या अशा अनेक आठवणी स्वतः कवीला व रसिक वाचकाला या संग्रहात भेटतात.

बऱ्याच कवितांना शीर्षके नाहीत, पण त्यामुळे कवितेच्या गुणवत्तेत कोणताच फरक पडत नाही. क्र.५ ची कविता पहा. कल्पना अशी– ज्योतीने एकदा वाऱ्याचे आणि अंधाराचे भांडण लावून दिले. पहाटे पहाटे थरथरताना ज्योत म्हणते की, धक्का कोणी मारला? तर अंधार म्हणतो, 'गैरसमज करून घेऊ नकोस. मी काही धक्का मारला नाही, तर तुला पेंग येते आहे, हे पाहून फक्त जरासे हालवून जागे गेले...बस्स!

*आणि हे पहा*
*पूर्वसूरींशी बोलताना जरा अदबीने बोलावे,*
*आम्ही येथले प्राचीन रहिवासी आहोत*
*तुम्ही काय आज आहात*
*उद्या नसालही कदाचित...!*

'सोशल सटायर'चा एक बेमालूम नमुना. खरे तर वाचकाला वास्तवाचे भान आणून देणारे, अंतर्मुख करणारे हे विलक्षण धक्कातंत्रच होय.

क्र. ७,१२ या अभंगसदृश रचना आहेत. त्यांवर करंदीकर, सुर्वे, मर्ढेकर या कवींची स्पष्ट छाप दिसते. मात्र त्यातून काही नवा विचार, नवे चिंतन जाणवते हेही खरेच. शहर ही कविता त्या दृष्टीने बघावी,

*ज्ञानियासी येथे...निवृत्ती वेतन*
*आणिक इतरां.... फाके होती...!*

आपल्या गावाकडच्या दारिद्र्याचे चटके कवीच्या शब्दांतून दृग्गोचर होतात. एका भाकरीत अर्धेच पोट भरते. मग उरलेली पोटाची पोकळी घोट घोट पाणी पिऊन भरून काढायची. अर्थात ही विषमता वाचकाला अपरिचित नाही. अखेर विठ्ठलाला कवी साकडे घालतो आणि म्हणतो,



अनुक्रमणिका







*विठो तुझ्या पायी आता*
*मागे अखेरची भीक*
*देरे अशी दे भाकरी*
*पुन्हा लागो नये भूक...!*

हे कवीचे मागणे मात्र उल्लेखनीयच.

सुकूत शैलीतल्या अनेक रचना संग्रहातून विखुरल्या आहेत. त्यातूनही कवीचे एक वेगळेच सामर्थ्य प्रकट होते. क्र. १०, 'आठवणी,' संपत गायकवाड. स्टेट, सरकार, क्र. २६, २७, २८, २९ या कविता विशेष वाचनीय ठराव्यात. कवीजवळ स्वतःची एक खास नर्मविनोद बुद्धी आहे. त्याच्यात एक अवलियाच दडून बसला आहे हे लक्षात येत राहते. तटस्थ राहून आजूबाजूच्या विसंवादी आणि विसंगत वातावरणावर भाष्य करताना कवीतला 'रिफॉर्मिस्ट' वारंवार प्रकट होतो. त्याची असहाय मनःस्थितीदेखील प्रकट होत राहते. क्र. २० च्या कवितेत,

*तर हे हातांनो,*
*आपण यात हात घालू इच्छित नाही*
*असे म्हणत किती काळ दूर उभे राहणार आहात*
*मग रक्तालाच धस्स म्हणून का घाबरता,*
*तुमच्याच तर अग्रणी नखे दिलीत*
*ती अशी बोथट का बनविता...*
*हातांनो, असे हात खाली का घेता*
*जरा दोन हात करा...*
*जरा दोन हात करा...!*

बांधीलकीच्या नादात कवित्वाचे भानही काही वेळा सुटल्याचे दिसते आणि मग कविता केवळ विधानात्मक, तत्त्वचर्चात्मक बनते. या दृष्टीने भोपाळ चिकित्सा, क्र. २२, ११ या कविता पहा. एखादा निबंध असावा अशा या कविता वाटतात. ही पसरट गद्य शैली एकूण कवित्वाला हानीकारक ठरते आहे असे मनोमन वाटून जाते.

नर्मविनोदाविषयी उल्लेख केलाच आहे. त्याचे काही नमुने बघण्यासारखे आहेत-

*चिमणीला मग बिल्डर बोले*
*का ग तुझे डोळे ओले*
*काय सांगू दादा तुला*
*माझा घरटा कोणी नेला*
.........
*चाच्यांनी तर कमालच केली*
*लोकल गाडीच पळवली*
*आणि कारकुनांचे जेवणाचे डबे*

*ओलीस ठेवले*
*नंतर काय झाले कुणास ठाऊक...:*

कवीला प्रेमाचे अर्थात वावडे नाही, पण हे प्रेम यंत्रयुगातले आहे. ते व्यवहारवादाने केवढे घट्ट जखडले गेले आहे. बायकोलाच प्रेयसी करण्याचा घाट कवीने एका कवितेत घातला आहे, तेव्हा बायको 'चोरून भेटू' असे म्हणते. समुद्र किनाऱ्यावर तिला भेटायला बोलावले असता ती बिचारी घरातली खरकटी वगैरे सर्व उरकून येते. आणखी दुर्दैव पुढेच आहे. मित्राने रात्रीच्या एकांतासाठी खोली देऊ केली, तर बिचाऱ्या बायकोला आपल्या उपाशी पोरांची आठवण येत राहते.

या कवितेचा शेवट करताना कवी म्हणतो,

*परतलो मग शेवटी आपल्या घराला*
*ती म्हणाली कोणती भाजी डब्याला !*

असेच, 'विफल' प्रेम आणखी एका कवितेत कवीच्या वाट्याला आल्याचे लक्षात येते. (क्र. १५) खास टाळ्यांची ही एक 'मंचीय' कविता पहा,

*मी समन्ता फाक्सच्या हातच्या स्थळा नाकारले*
*आणि चिपळुणच्या शकूशी लग्न केले शेवटी !*

बहुतांशी कवितांतून असा नर्मविनोद, वास्तवातील असमतोल, विसंवाद, विरोधाभास, आपल्या वाट्याला येणारी परिस्थितीशरणता, वैफल्य आदी भावभावनांचे प्रत्ययकारी चित्रण करण्यात कवी कमालीचा यशस्वी झाला आहे. कवीचे वास्तवाचे हे अनोखे भान वाचकाला खुलवत ठेवते. कवीजवळ असलेली एक प्रकारची परिपक्व मनोवस्था रसिकाला प्रभावित करीत राहते. त्याच्याजवळ असलेल्या शब्दांचे एक वेगळेच सामर्थ्य जाणवू लागते. आजूबाजूस पाहू जाता आता अशाच कवितेचे वारे आहे. मात्र सौंदर्यवादी कवितेच्या रसिकांपुढे ही कविता काही प्रश्नचिन्हे उभी करते हेही म्हणायला हवे. मानवी जीवनात केवळ वैफल्य, निराशा, विसंवाद एवढेच भरून राहिले आहे काय, हा एक मोठा प्रश्न. पण विशिष्ट मनोवृत्ती आणि अनुभूती घेणाऱ्या कवींकडून असे प्रश्न सुटावेत अशी अपेक्षा करणेही योग्य नाही. वास्तवाचे अनोखे आणि अंतर्मुख करणारे भान असलेल्या या कवीकडून अधिक सुंदर कवितांची अपेक्षा निर्माण करण्याचे सामर्थ्य नक्कीच या कवितांतून प्रकट होते– शेवटी,

*शहर झोपते बंकरमध्ये । अस्तित्वाचा मिटून श्वास*
*आणि ढगाच्या आडून कोठे । शहरावर चांदणे पसरते !*

या ओळी रसिकांच्या मनाला निववतात.

ग्रंथालीने एक फार चांगला काव्यसंग्रह दिल्याचे समाधान वाटते.

**(वाटेवरच्या कविता : अशोक नायगावकर, ग्रंथाली प्रकाशन, मुंबई)**
**(९/११४६, सूरश्री, लकाकी मार्ग, पुणे ४११०१६)**



अनुक्रमणिका




प्रा. कृष्णा चौधरी

# चिरवेदना व्यक्त करणारा प्लॅटिनम

'उन्हातलं झाड' हा भगवान भोईर यांचा 'एक हुंदका यासाठी' यानंतरचा दुसरा काव्यसंग्रह. दलित साहित्यातील दमदार कवी. दलित मानसिकतेचा तीव्र संघर्ष इथे आत्मशोधाच्या प्रबळ जाणिवेतून व्यक्त झाला आहे. दलित साहित्याचे साक्षेपी टीकाकार प्रा. गंगाधर पानतावणे यांची विवेचक व विश्लेषणात्मक अशी प्रस्तावना काव्यसंग्रहाला लाभलेली आहे. "भोईरांचं 'उन्हातलं झाड' ही व्यथा– वेदनांची यात्रा आहे. न थांबणारी, न थकणारी, न करपणारी, न विझणारी. तेजस्वी क्षितिजाचा वेध घेणारी,' हा प्रस्तावनेतील अभिप्राय तंतोतंत कवीच्या काव्याला लागू पडतो. भोईरांची कविता मानवी जीवनातील चिरवेदना व्यक्त करणारा प्लॅटिनम आहे.

आजची दलित कविता एका सांस्कृतिक परिवर्तनाच्या उंबरठ्यावर उभी आहे. उदात्त जीवनमूल्यांचा आविष्कार करण्याची बांधिलकी बाबासाहेबांनी तिच्यावर टाकली आहे. या नव्या संघर्षशील जाणिवेतून तिला नवे समताधिष्ठित परिवर्तन घडवून आणायचे आहे. दलित कवितेचा आदिबंध आता बुद्ध, कबीर व आंबेडकरी विचारांशी जुळलेला आहे. फुले व आंबेडकर यांच्या प्रबोधनातून एक नवे सांस्कृतिक मानवतावादी आत्मभान तिला आलेले आहे.

भोईरांच्या 'धार' या कवितेत शोषणरहित नवसमाजनिर्मितीच्या सम्यक क्रांतीची जाणीव व्यक्त होते. 'बा, रापी खाली घे. बाबासाहेबांनी आपल्या हाती लेखणी दिली. आता रापीची धार लेखणीला आली.' दलित कवितेचा आशय व आकृतिबंध परंपरेला नकार देत, विद्रोहाचे तांडवनृत्य करीत आंबेडकरी जाणिवेतील विविध मानसिक पातळ्यांचा वेध घेत असतो. यातूनच एका नव्या सांस्कृतिक परिवर्तनाची, स्थितीगतीची सामाजिक जाणीवही व्यक्त होत असते. कधी हे परिवर्तन संस्कृतीच्या कराल दाढेत भरडले जाते.

*जातीचा विषवृक्ष*
*गगन चुंबितो*
*वृक्षछायेत वेली विषमय झाल्या*
*मृदूकणात विषकण भिनले*
*अवघे वारे विषमय झाले.*

कवीच्या न संपणाऱ्या दुःखाच्या प्रवासाला आरंभ झाला. इथे वर्णविषमतेने मानवी



अनुक्रमणिका

स्वातंत्र्याचेच हनन केले. अंधश्रद्धा गेली नाही. विज्ञाननिष्ठा रुजली नाही. पोथ्यांच्या काटेरी वनात विज्ञानफुले कशी फुलावीत ? इथे देवळातला दगड पवित्र व झोपडीतील माणूस मात्र अपवित्र आहे. 'किंस्वित वनम् क उस वृक्ष आम येतो द्यावा पृथ्वी निष्टतक्षुः' द्युलोक आणि पृथ्वी हा जो प्रासाद तासलेल्या लाकडांपासून बनविला आहे, ती लाकडे कोणत्या वनापासून आणली होती ? ऋग्वेदात हे विश्व एक महान प्रासाद आहे, असे वर्णन केलेले आहे. 'एकं सद् विप्राः बहुधा वदन्ति,' असे परब्रह्माचे वर्णन केले जाते; पण प्रत्यक्ष जीवनात मात्र प्रचंड विरोधाभास दिसतो. इथे वर्णविषमतेने तर हजारो पिढ्यांच्या कत्तली केलेल्या कवीला दिसतात. निरागसांच्या या निर्घृण कत्तली धर्मांध व पाषाणहृदयी संस्कृतीरक्षकांनी केलेल्या आहेत. हे संस्कृतीरक्षक सफेद कावळे तोंडावर धर्म व संस्कृतीची मधाळ भाषा बोलतात,

*सफेद कावळे*
*पोपटासारखे*
*मिठू मिठू बोलताहेत*
*चिमण्यांची घरटी*
*उद्ध्वस्त करणारे*
*बांधिलकीची पोपटपंची करताहेत !*

इथे पाय जन्मतःच बोडखे आहेत. इतरांच्या पायांचा विचार करण्यात त्यांचे आयुष्य खर्ची पडले, पण बाच्या हातची 'रापी' कधीच गेली नाही. इतरांसाठी पत्रावळी शिवणाऱ्यांना स्वतःचे आयुष्य कधीच शिवता आले नाही. ग्रामीण भागात शुभाशुभांची वटवाघुळे झाडावर लटकलेली. अंधश्रद्धांच्या कोळीष्टकांनी चक्रव्यूह विणलेले. लाख सूर्य तळपले तरी इथली गावे अंधारातच राहणार. अंधश्रद्धेच्या पोलीओने सगळे मेंदू पांगळे झाले. सूर्याच्या दाहकतेचे हिमनग झाले. माझ्या एका ठिणगीने कोणते परिवर्तन होईल, असा प्रश्न कविमनाला पडतो. सूर्यही इथे बंदिस्त झाला तर ! इथली संस्कृती ही अशीच तकलादू. पापपुण्याच्या व स्वर्ग-नरकाच्या कल्पनांनी पुण्य कंसाबाहेर ठेवले व पाप कंसात ठेवले. पापपुण्याचे कुंपण घालणारे हे कंस उद्ध्वस्त केले पाहिजेत. कवी सूर्यकुळातील असल्यामुळे प्रकाशपूजनाची व सृजनाची ओढ त्याला लागली आहे. इथली मूळ संस्कृती द्राविडीयन. आर्य संस्कृतीने स्त्री व शूद्रांना आरोपी म्हणून वर्णव्यवस्थेच्या विषारी पिंजऱ्यात उभे केले. सीता ही उपेक्षित संस्कृतीचे प्रतीक. तिच्या नशिबात अग्निदिव्यपरीक्षा. 'चिरंजीव' ही कवीची मानवी जीवनातील गहिऱ्या चिंतनाच्या भावपातळ्या व्यक्त करणारी कविता. पंढरीची वाट चालणारे गावकुसाबाहेरील झोपड्यांकडे वळले नाहीत. रामाचा धावा करणाऱ्यांना झोपड्यांतील आक्रोश कधी ऐकू आला नाही. इथली संस्कृती अशी दगडी संस्कृती आहे. चालता चालता कधी एखादे रानफूल गवसेल या प्रतीकातून मानवी

जीवनावरील उदंड विश्वासच व्यक्त होतो. कधी कधी वर्णविषमतेसह इथे वर्गविषमतेची जाणीवही विरोध लयीतून व्यक्त होते, तेव्हा कवितेला प्रखर सामाजिक जाणिवेचे आयाम लाभून एक तऱ्हेची व्यामिश्रता प्राप्त होते. या वर्गीय आत्मभानातून इथली स्थितीगती साकार होताना मार्क्सच्या विरोधविकासवादी द्वंद्वाच्या भव्य कैलासलेण्याचे दर्शन घडते.

*श्रमलेल्या सावल्या*
*वाटा तुडवत तुडवत झपापलेल्या*
*झोपडी झोपडीत युगांचा अंधार*
*जीवनवाक्य प्रश्नांकित बनलेले !*
*पैलतीरावर*
*उजळलेले अवघे क्षण*
*गगनचुंबी इमारतीत*
*एकेक चंद्रसूर्य उगवलेला*
*जीवनवाक्य उद्‌गार चिन्हांनी सजलेले !*

कवी उपरोधात्मक शैलीचे उपयोजन करतो, तेव्हा त्याच्या शब्दांना व्यंजनाधिष्ठित अनेकार्थसूचक अर्थवलये निर्माण करण्याचे सामर्थ्य प्राप्त होते.

*बापहो, खंडोबाची आण घेऊन सांगतो*
*आम्ही लय लय भाग्यवान*
*आमचा नवरा कधी मरत नाही*
*आम्ही अखंड सौभाग्यवती !*

'तो मेल्यावर' ही कवीची समर्थ कविता. आत्मा-परमात्मा व स्वर्ग कल्पनावर थुंकणारा बुद्धिवादी मेला, स्वर्गवासी झाला म्हणून अनेकांनी डोळे ओले केले. श्रद्धांजलीही वाहिली. इथे अखंड बुद्धीचा दुष्काळ असतो, अशा मरूभूमीत तो जन्मला. कावळयांच्या या देशात तोच एक हंस होता, या काव्याने मात्र अपेक्षित परिणाम साधला. कावळयांनी चोची मारून संस्कृतिरक्षकांनी कवीला रक्तबंबाळ केले. 'माऊली' ही कथात्म कविता. रमाई व बाबांचे भावबंध व्यक्त करणारी. रमाईच्या निर्वाणप्रसंगी बाबासाहेबांचे डोळे पाणावले.

*रमाईने उजवा हात*
*साहेबांचे डोळे पुसण्या वर नेला*
*हात खळकन खाली पडला*
*महावृक्षाला सावली सोडून गेली*

अत्यंत संयमित शब्दाने इथे एक भावसत्य व्यक्त झाले. टी. एस. इलियट म्हणतो In fact, the bad poet is usually unconscious where he ought to be unconscious, and conscious where he ought to be unconscious. इथले कारुण्य कसे बोलके झाले यावर अधिक स्पष्टीकरणाची गरज नाही.

दलित कवितेचे नाते सांस्कृतिक परिवर्तनाच्या बांधिलकीशी असल्यामुळे ती सूर्यकुळाची कविता आहे. स्वातंत्र्य, समता व बंधुतेचा पुरस्कार ती करीत आहे. प्रज्ञा व करुणेचे दिव्य चक्षू तिला तथागतापासून लाभलेत. मानवी अखंड प्रेमाचा हा अक्षम झरा संतवाङ्मयातही लुप्त व कोरडा झालेला का बरे दिसावा ? हा मानवतेचा झरा कवीला बुद्ध, कबीर, फुले व आंबेडकरांच्या जीवननिष्ठेत आढळला. महाड व नासिकच्या सत्याग्रहप्रसंगी बाबांची भूमिका समतामूल्यांच्या प्रस्थापनेची असल्यामुळे बाबासाहेब कवीच्या काव्याचा विषय झाले. अपयशातूनच मानवी संस्कृतीच्या यशाचा इतिहास लिहिला जातो. इथल्या परंपरावादी घुबडांचे डोळे दिपविणारी ती नवी क्रांती होती. म्हणून कवी म्हणतो, इथल्या परंपरावादी घुवडांचे पंख छाटलेच पाहिजेत व नव्या क्रांतिसूर्याचे स्वागत केलेच पाहिजे.

*क्रांतिसूर्या*
*चवदार तळ्याच्या ओठाला स्पर्श केलास*
*नि जगातील सर्व जलाशयात*
*तुझे रुपेरी प्रतिबिंब पडले !*
*जलाक्षरांनी तुझे नाव*
*लाटांच्या मखमली क्रांतीवर गोंदले !*

भोईरांच्या काव्यातील ही जाणीव परंपरावादी रूढ जाणीव नाही. ती काळोखी तर नाहीच नाही. तिचा रूपबंध हा तथाकथित संवाद, विरोध व समतोल लयीच्या पारंपरिक सौंदर्यशास्त्रावर आधारलेला नाही. रेंगाळत राहून परंपरेशी छुपी मैत्री करण्याचे कौशल्यही तिच्यात नाही. कवीला युगायुगापासूनचा काळोख नव्या संघर्षशील मशालीने उजळायचा आहे. वर्णव्यवस्थेचा विध्वंस करून शोषणरहित समाज निर्माण करण्याचे त्याचे ध्येय आहे. परंपरेच्या जाणिवेला समकालीन वास्तवाची जाणीव जेव्हा भिडते, तेव्हा उत्कृष्ट काव्य निर्माण होत असते. Poetry is not a turning loose of emotion, but an escape from emotion; It is not the expression of personality but an escape from personality.

एका अर्थाने कवी आपल्या काव्यनिर्मितीत भावनापासून मुक्त होऊन वैश्विक जीवनसत्याचे दर्शन घडवीत असतो. कवीचे कार्य इलियटच्या मते प्लॅटिनमचे– उत्प्रेरकाचे असते. उत्प्रेरक रासायनिक अभिक्रियेचा वेग वाढवतो, पण स्वतः मात्र अलिप्त असतो. कवीही पारंपरिक वास्तव व समकालीन वास्तव याची आपल्या प्रतिभाशक्तीने सांधेजोड करून स्वतः अलिप्त असतो. आपल्या वर्णव्यवस्थेची व वर्गव्यवस्थेची वेदना इथे कवी व्यक्त करतो म्हणूनच मी 'उन्हातलं झाड' ला दुःखाच्या महायात्रेचा प्लॅटिनम असे संबोधले आहे.



अनुक्रमणिका

*झाडांनी सवता तापायचं उन्हात*
*पर दुसऱ्यांना सावली द्यायची*
*आपुन म्हंजे झाडच की*
*सदाचं उन्हात असलेलं !*

(उन्हातलं झाड : प्रा. भगवान भोईर,
स्वप्नील प्रकाशन, बी. एन्. एन्. कॉलेज भिवंडी जि. ठाणे, मूल्य २५ रुपये.)
(रामाळेश्वर वार्ड, रामटेक, जिल्हा नागपूर.)

---

डॉ. न. म. जोशी

# चिंतनशील शब्दकळा

कविताविषयक सातत्याने कार्य करणाऱ्या काही संस्थांतून हौशी कवी आपली कविता फुलविण्याचा प्रयत्न करतात आणि अशा प्रयत्नांतूनच निवडक कसदार कवितेची देणगी मराठी काव्यसरितेला श्रीमंत करून जाते. अशा कवींपैकी श्री. दत्तात्रय जयवंत जोशी यांचा 'अर्घ्य' हा संग्रह त्यांच्या चिंतनशील शब्दकळेची साक्ष पटविणारा आहे. कविवर्य कुसुमाग्रजांनीही श्री. जोशी यांची शब्दांची दिवाळी रसिकांना आवडेल, अशी असल्याची शुभेच्छा दिली आहे, तर कविवर्य कै. बा. भ. बोरकर यांनी त्यांच्या नितळ व सहजसुंदर शब्दकळेचा गौरव केला आहे.

अर्पणपत्रिकेतच कवी म्हणतात,

*प्रश्न साऱ्यांना अनेक*
*पण उत्तर हे एक*
*एकमेकांसाठी होऊ*
*आपणच एकमेक.*

विद्यमान समस्यामय जीवनातील असंख्य प्रश्नांना 'एकमेक' हे एकमेव उत्तर असल्याचे कवी सूचित करतात, तेव्हा त्यांच्या कवितेला समाजचिंतनाची बैठक असल्याचे जाणवते.

'अनुबंध' या अनुक्रमणिकेवरून नजर टाकली, तर चौसष्ट कवितांच्या या कवितांजलीची रचना आगळ्यावेगळ्या पद्धतीने केली असल्याचे जाणवते. कोणत्याही शुभकार्याची सुरुवात गणेशस्तुतीने करायची ही आपली संस्कृती. इथेही पहिली कविता

आरती स्वरूपातच आहे. 'रूप गणेशाचे ओंकार मूर्ती' या स्वरूपात कवीचा भक्तिभाव जागृत झालेला दिसतो.

आणि शेवटची कविता आहे 'अर्घ्य'.

*मोकळा मी येथ आलो*
*मोकळा मी जात आहे*
*येथले येथेच सारे*
*अर्घ्य हे मी देत आहे.*

माणूस मोकळा येतो, मोकळाच जातो हे जीवनविषयक सत्य श्री. जोशी शब्दांकित करतात, तेव्हा 'पांघरसी जरी असला कपडा, येसी उघडा, जासी उघडा' या काव्यपंक्तींची सहज आठवण होते.

येथले येथेच सारे देण्याला कवी अर्घ्य म्हणत आहे. ही आध्यात्मिक अनुभूतीशी नाते सांगणारी प्रक्रिया आहे. 'वैफल्याचे दुःख व्यर्थ आहे, कारण वठलेल्या वृक्षालाही पालवी फुटते', असे सुभाषितवजा चिंतन व्यक्त करणाऱ्या 'पालवी' सारख्या कविता या संग्रहात आहेत.

'स्वातंत्र्याचे गीत', 'आम्ही', 'एकता' यांसारख्या देशभक्ती व देशस्थिती यांबाबत विचार व्यक्त करणाऱ्या कविता असलेल्या या अर्घ्यात भावधारेचा मूलस्रोत्र आहे तो मात्र भक्तिप्रवणतेचा आहे.

'अद्वैताच्या आनंदाचा भक्त सोहळा पाहे' असे कवी जोशी 'विठू प्रकटला आहे' या कवितेत सांगतात, तेव्हा महाराष्ट्राच्या संस्कृतीची बैठक टाळमृदंग, दिंड्या, पताका यांनी विनटलेल्या भक्तिधारेची आहे, याचा प्रत्यय येतो.

या कवितासंग्रहात सध्याचा लोकप्रिय कविताप्रकार 'गजल' ही आहे. पण ही गजल वृत्तीने चिंतनशील व आत्मलक्षी आहे.

*मोकळेच यायचे, मोकळेच जायचे*
*भरून घट मोकळे, गीत आहे गायचे*

अशी भावनिर्भर वृत्ती गजलकृती मध्ये आहे.

काही जीवनविषयक दृष्टिकोण 'गागरमे सागर' या स्वरूपात कवितेचे रूप घेतात. चढ आहे म्हणून उताराचे सुख, विरह आहे म्हणून मीलनाची भूक.

दुःख आहे म्हणून सुखाला चव, ऊन्न आहे म्हणून सावलीचा गौरव. अशा प्रकारची बीजतत्त्वे कवी सहज सांगून जातात.

रीत प्रीतीची, गंध प्रीतीचा यांसारख्या कविता चंदनी प्रीतीचा मनात दरवळणारा गंध शब्दांकित करतात.

कवी द. ज. जोशी यांची या संग्रहातील आत्मरूप ही कविता म्हणजे कवीने केलेले आत्मतत्त्वाचे सूक्ष्मावलोकन.

*जळो वासनेचे बीज राहो अनासक्त मन*
*नांदो दया, क्षमा, शांती आनंद हा चिरंतन*

असे भावचिंतन करणारे 'अर्घ्य' अभिनंदनास पात्र आहे.

(अर्घ्य : द. ज. जोशी, पृथ्वीराज प्रकाशन, पुणे : पृष्ठे ६४, मूल्य ३५ रु.)
(१०१३, सदाशिव पेठ, पुणे ३०.)

---

नंदा सुर्वे

## एका मनस्वी माणसाचे वेधक जीवनदर्शन

आपल्या निकटवर्तियाचं आपण पाहिलेलं जगणं नीटसं आठवत असतं. आणि त्यानंतर म्हणजे त्या व्यक्तीच्या जीवनोत्तर काळात त्याच्या जगण्याचे आपण लावलेले अर्थ, त्या निमित्ताने केलेली विश्लेषणं आणि त्या व्यक्तीच्या एकूणच जीवनप्रवाहाचं चित्रण कधी लिप्त होऊन केलं जातं, तर कधी अलिप्त होऊन.

विभावरी शिरूरकर यांची अलीकडेच प्रसिद्ध झालेली 'खरे मास्तर' ही कादंबरी वाचल्यानंतर हेच मनात येतं. इतकं ते स्पष्टपणे प्रतिबिंबित झालं आहे. या लेखिकेच्या बहुतेक कादंबऱ्या विभावरी शिरूरकर या (टोपण) नावानेच प्रसिद्ध झाल्या. 'उमा' या एकाच कादंबरीचा अपवाद. ती मात्र मालती बेडेकर या खऱ्या नावानिशी प्रसिद्ध झालीय.

तर, विभावरी शिरूरकर वा मालती बेडेकर यांच्या समृद्ध साहित्य विश्वातली ही आणखी एक मूल्यवान भर. समस्त वाङ्मयव्यवहार संस्कृतीमध्ये लक्षवेधक ठरू शकण्याइतकं मूल्य प्राप्त झालेली.

कादंबरी, चरित्रलेखन किंवा संस्मरणे असं त्रिविध रूप 'खरे मास्तर' या साहित्यकृतीला लाभलंय असं वाटतं. साहित्यातील हे वेगवेगळे पारिभाषिक प्रवाह त्यामध्ये दिसतात. प्रस्तावनेमध्ये लेखिकेने आपल्या या साहित्यकृतीला 'पुस्तक' असं संबोधलंय. अर्थात हा उल्लेख फार जाणीवपूर्वक झाला असावा असं वाटत नाही. तो अगदी सहजपणे ओघात आल्यासारखा वाटतो. तरीही निकषाकडे वळायचं ठरवून त्या स्मरणपटाला कादंवरीमय करून लेखिकेनं अभिव्यक्ती स्वातंत्र्याचा लाभ घेतलेला दिसतो. कारण त्यांनी तिसऱ्या प्रकरणाच्या अखेरीस स्पष्टपणे म्हटलंच आहे, "कादंबरी म्हणजे कल्पनेच्या तप्त

मुशीतून ओतलेला इतिहास. मग आपण अण्णांचा इतिहास कादंबरीच्या रूपानं लिहून पाह्यचा. सत्य आणि काल्पनिक यांचं मुक्त हस्तानं मिश्रण करून. लेखिकेच्या विश्लेषक मनाच्या भूमिकेतून या गुणसंपन्न कादंबरीचं लेखन झालं आहे.

पहिल्या प्रकरणामध्ये लेखिकेच्या मनात कादंबरीलेखनाची प्रक्रिया कशी सुरू झाली ती पार्श्वभूमी आलेली आहे. दुसऱ्या प्रकरणामध्ये त्यांच्या वडिलांच्या घडत जाण्याचा आरंभकाळ त्यांच्याच आत्मकथनामध्ये आलाय. पण ते कथन 'खरे मास्तर' घडण्याच्या आधीच्या टप्प्यावरच थांबलंय. तो गोठणबिंदू वितळवून टाकून त्याला प्रवाहित करण्याच्या उत्कटतेमधून ही कादंबरी तिसऱ्या प्रकरणापासून आकारायला लागते. त्यासाठी लेखिकेला आईनं सांगितलेली कथनं, घोडनदीमध्ये 'खरे मास्तर'ना भेटलेले देशपांडे मास्तर यांनी सांगितलेली संस्मरणं, लेखिकेची आत्मस्मरणं हे घटक साहाय्यभूत होत गेले. यातून कादंबरीलेखनाला निश्चित प्रवासाची दिशा मिळत गेली आणि ही सहजसुंदर लेखनयात्रा सुरू झाली.

निरर्थक पारंपरिकता टाळण्याइतका धीटपणा या 'खरेमास्तरां' कडे होता. विशेष म्हणजे त्यांनी आपल्या पत्नीला रिकाम्या वेळेचा उपयोग शिक्षित होण्यासाठी खर्च करण्याचा वस्तुपाठ दिला. ते आपल्या पत्नीला, तत्कालीन संकेतांना धाब्यावर बसवून सरळ नावाने हाका मारायचे. यामुळे त्यांना प्रतिगाम्यांकडून निषेधाचे चटके सहन करावे लागायचे. अर्थात त्याबाबत ते बेफिकीर होते. कारण आपल्या तत्त्वांशी त्यांचं इमान होतं. या नव्या प्रवाहाशी जुळवून घेताना त्यांच्या पत्नीची मात्र सुरुवातीला थोडी मानसिक फरफट झाल्यासारखी दिसते. पण त्यांच्या या नवप्रस्थापन भूमिकेचे फायदे त्यांच्या मुलांना पुढे होत गेले. मुख्य म्हणजे त्यांनी मुलींसाठी शिक्षणाचं दालन फक्त खुलं ठेवलं असं नव्हे, तर त्यांना शिक्षणासाठी प्रवृत्त केलं. अशा या खरेमास्तरांविषयी त्यांचे स्नेही देशपांडे मास्तर म्हणाले होते, 'त्यांची बुद्धी जागरूक असे. त्यांना स्वतःविषयी भ्रम नसे'. याच देशपांडे मास्तरांनी लेखिकेला इशारा दिला होता की, तू त्यांची मुलगी आहेस हे विसरायला हवंस. अलिप्तपणे, त्रयस्थासारखं, निर्विकारपणे त्यांच्याकडे बघून लिहायला हवंस. या त्यांच्या बहुमोल सल्ल्याचं पालन करणं या साक्षेपी लेखिकेला अवघड नव्हतं. आणि मला वाटतं, त्या हेतूनंच त्यांनी बहिणींची नावं बदलली असावीत. कादंबरी-लेखनामधलं स्वातंत्र्य आणि कल्पनाविलासाचा लाभ त्यांना या संदर्भात घेता आला, आणि वाङ्मयीन कलाकृतीचं मूल्यही जपता आलं.

आपल्या वडिलांचं एक लोकविलक्षण व्यक्तिमत्त्व लेखिकेला भावलं होतं. समाजातल्या प्रत्येक प्रवाहाशी ते जुळवून घेणारं नव्हतं. त्यांची स्वतःची अशी काही ठाम मतं होती. त्यांचा अवलंब ते सहजधारणेतून करत असत. परिणामांची भीती त्यांच्या मनामध्ये नसायची. कारण आपल्या विवेकबुद्धीशी त्यांनी कधी प्रतारणी केली नव्हती.

म्हणून त्यांचा वावर अतिशय निर्भिड असे. या त्यांच्या गुणांचं लेखिकेला कौतुक होतं. ज्या माणसाजवळ पुरेसं शिक्षण नव्हतं, ड्रॉइंग मास्तर म्हणूनच ज्यांचं व्यक्तिमत्त्व तयार झालं त्या चित्रकलेच्या मात्र त्यांनी काही परीक्षा दिलेल्या होत्या. या कलासिद्ध भांडवलावर त्यांनी आपला आठ मुलांचा प्रपंच उभा ठेवला होता. कसली कमतरता न भासू देता.

खरेमास्तरांचं अवतीभवतीच्या सामाजिक बदलांकडे लक्ष असायचं. त्यातून समाजाच्या स्थितीगतीचाही अभ्यास होत असे. मुस्लीम लोक एकत्र नमाज पढतात. ख्रिश्चन लोक चर्चमध्ये प्रार्थनेसाठी एकत्र येतात. पण सगळेच्या सगळे हिंदू मात्र देवळात एकत्र येत नाहीत. या धर्मात वेगवेगळे जातीय स्तर आहेत. मानसिक पातळीवर भिंती उभ्या आहेत. एकजूट भावना नाही. दैवतंही जातीनिहाय होती. जाखाई, जोखाई, मरीआई ही दलितांची दैवतं होती. हिंदूंच्या देवळांमध्ये त्यांना मुक्त प्रवेश नव्हता. त्यामुळे धर्मांतराचा मोठा धोका निर्माण झाला होता. म्हणून खरेमास्तरांनी एका खासगी बैठकीत प्रस्ताव मांडला होता की, कोणत्याही देवळात सर्वांना मुक्त प्रवेश द्यायला हवा. परंतु प्रतिगाम्यांनी त्या प्रस्तावाचे खंडन केले होते. हे वेगळं सामाजिक भान असणारे खरेमास्तर. मध्यमवर्गीय म्हणूनच जगले. समाज परिस्थितीच इतकी ताठर होती की, त्यांच्या या वेगळ्या दृष्टिकोनाचा डोळसपणानं आदर केला गेला नाही.

खरेमास्तर सत्यधर्मी होते. सन्मार्गी होते. खोटेपणा, फसवणूक याची त्यांना मनस्वी चीड होती. कारण त्यांचा जीवनाकडे बघण्याचा दृष्टिकोन अतिशय नितळ होता. बेगडी श्रद्धा लोकांमध्ये रुजू नयेत यासाठी ते प्रयत्नशील असायचे. घोडनदीत एकदा एक ढोंगी साधू आलेला होता. तो श्रद्धावानांची दिशाभूल करत होता, हे खरेमास्तरांच्या लक्षात आल्यावर त्यांनी ते आव्हान स्वीकारलं आणि त्या ढोंगी साधूला तिथून पळून जाणं भाग पाडलं. या वेळी मात्र लोकांना त्यांच्यातल्या सत्यवादी मूल्यांची ओळख पटली.

खरेमास्तरांच्या धार्मिक निष्ठाही अबाधित होत्या. ब्रिटिशांच्या आमदानीत नोकरी करूनही ते शरणागत झाले नाहीत. धर्मांतराच्या त्यांच्या आग्रहाला खरेमास्तरांनी धत्तुरा दिला आणि साहेबाचा क्षोभ ओढवून घेतला. त्यांच्या पगाराला ओहोटी लावली गेली. खरेमास्तरांच्या तत्त्वसिद्ध मनानं हे अपयश स्वीकारलं, पण आपल्या मूल्यांशी, श्रद्धाभावनेशी तडजोड केली नाही.

शेवटच्या प्रकरणात हे खरेमास्तर आत्मगत झालेले दिसतात. तत्त्वचिंतकाच्या भूमिकेत लेखिकेनं कादंबरीच्या या नायकाला नेलेलं आहे. त्यामध्ये ते अनेकदा आत्मसंवादी झालेले दिसतात. व्यक्तिरेखेच्या मनोगतांचे आविष्कार त्यामधून प्रकट होत असतात. भूतकाळातील घटनांचे चढते, उतरते आलेख, त्या अनुषंगानं वर्तमान स्थितीतलं जगणं, भविष्याच्या चिंता आणि त्यांतून मनाला आलेलं एकाकीपण माणसाला अंतर्मुख करतं. या एकाकीपणाच्या संदर्भात ते स्वतःला प्रश्न विचारतात, 'एकटेपणा येतो तो आपल्यासारख्या गरीब,

अर्धशिक्षित माणसाच्याच वाट्याला येतो असं नाही. तर फडकेंसारख्या नामांकित, विद्वान माणसाच्या नशिबीही तो असतो. कुणालाच तो शेवटी टळत नाही असं तर नसेल ?'

असे हे 'खरेमास्तर'. ज्यांनी यातल्या मथूलाही घडवलंय. (सर्वच मुलांना त्यांनी उत्तम घडवलं) आणि म्हणूनच ही मथू हे 'खरेमास्तर' फार ताकदीने उभी करू शकली. एक सतत धडपडणारी, तत्त्वप्रिय, कर्तव्यनिष्ठ, सजग अशी व्यक्तिरेखा वाचकांसमोर येऊ शकली. आपले वडील तथा 'खरेमास्तर' म्हणजे गुणांचा आदर्श असं सांगण्याचा लेखिकेचा अभिनिवेश नाही. ते जसे दिसले, जितके कळले तसे लेखिकेने लिहिलेत. त्याला प्रवाही रूप देण्यासाठी कादंबरी हा वाङ्मयप्रकार त्यांना सोयीचा पडला असावा. तरीही कालसंदर्भाबाबत थोडी संदिग्धता दिसते. त्यामुळे यातल्या कथासूत्राचा ओघ थोडा सुटल्यासारखा वाटतो. परंतु ही कादंबरी वाचायलाच हवी. जी उत्कृष्ट पुस्तकं आपण वाचनासाठी निवडतो, त्यांत ही अग्रस्थानी जाणारी.

**'खरेमास्तर'** : विभावरी शिरूरकर, पॉप्युलर प्रकाशन, मुंबई ३४ पृष्ठे-१३२, मूल्य ७० रु.
('आनंदरंग', २७/३ हिंगणे खुर्द, विठ्ठलवाडी, पुणे ५१.)

---

**डॉ. सदा कऱ्हाडे**

# अग्निसंप्रदायाशी तेजस्वी नाते सांगणारी 'ठिणगी' !

डी. बी. जगत्पुरिया यांचा 'ठिणगी' हा कवितासंग्रह लक्षवेधी आहे. ठिणगीला रूप असते आणि स्पर्श असतो. ठिणगी हे अग्निप्रकाशाचेच एक रूप आहे. ठिणगीला दाहक स्पर्शही असतो. म्हणून ठिणगी हे अग्निप्रकाशाचे आणि दाहकतेचे प्रतीक आहे. जगत्पुरिया यांची कविता अनिवार्यपणे 'अंधाराच्या भांगेत उजेडाचं मळवट भरण्या'स (पृ. १४) सज्ज झालेली कविता आहे, असे मला वाटते, 'हृदगत' (पृ. ५) ही लहानशी कविता म्हणजे एकाअर्थी जगत्पुरिया यांच्या सर्व कवितांचे सार आहे.

*'विद्रोह आणि पीडा*
*माझी पंढरी नि काशी*
*दुःख यातनेशिवाय*
*माझी कविता उपाशी.*
*माझ्या काळजात धग*
*माझ्या लेखणीत रग*

*पीडितांच्या सुखासाठी*
*माझ्या अक्षरांचा वग !'*

यावर अधिक भाष्य करण्याची आवश्यकता नाही. समाजाच्या कुणा एका समूहाची ही कविता नाही. समाजातील सर्वच पीडितांच्या, शोषितांच्या व्यथा-वेदनांना आणि यातनांना उद्गार देणारी ही कविता आहे. त्या यातनांची धग कवीच्या काळजापर्यंत पोचली आहे, आणि त्यामुळेच त्याच्या लेखणीला बळ प्राप्त झाले आहे. कवीचे शब्द तेजस्वी बनले आहेत आणि त्याचे विचार दाहक बनले आहेत. "आता शोषकांच्या बुडाखालीच विद्रोहाचा तप्त सुरुंग पेरायला हवा !" (पृ. १५) असं कवी म्हणतो, तेव्हा विचाराच्या दाहकतेचा वाचकांच्या मनावर होणारा परिणाम तप्तमुद्रेसारखाच असतो. हे सामर्थ्य जगत्पुरिया यांच्या काव्यात आहे. सामाजिक आशयाच्या बाबतीत त्यांची कविता केशवसुतांच्या कवितेशी नाते सांगते. आणि दाहक विचाराच्या बाबतीत कुसुमाग्रजांच्या 'विशाखा'ने प्रस्थापित केलेल्या अग्निसंप्रदायाशी नाते सांगते. पण नाते सांगते याचा अर्थ ही कविता अनुकरणशील आहे असे नाही. परंपरेचा वारसा घेऊन त्यात नवतेची भर घालण्याचा प्रयत्न करणारी ही कविता आहे.

*'काय आळविता*
*जीर्ण रूढीची*
*नीरस आणि बेचव गाणी*
*उठा, जिव्हेला पाजा-पाजा*
*डोळसतेचे सशक्त पाणी !'* पृ. १९

वरील या ओळी वाचताना केशवसुताच्या कवितांतील सामाजिक आशयाची आठवण होते. पण त्यापुढच्या-

*'नव्या युगाच्या पानांवरती*
*नवनवतेचे अक्षर काढू*
*परंपरेच्या वटवृक्षाची*
*छाटून टाकू दाहक पाने.'*

या ओळी वाचत असताना कवीला समकालीन युगाचे भान कसे आहे ते जाणवते. या कवीची भूमिका विद्रोही आहे. विचारात दाहकता आणि बंडखोरी आहे. पण त्याची वृत्ती विध्वंसक नाही. परंपरेचा वटवृक्ष त्याला मुळासकट उखडून टाकायचा नाही. समाजजीवनाला, व्यक्तिजीवनाला दाहक असणारी जी पानं असतील तीच फक्त छाटून टाकायची. 'नव्या मनूच्या अधरावरती, कलम करू या तेजस गाणे,' (पृ. १९) असे जेव्हा कवी म्हणतो, तेव्हा त्याच्या कवितेतील 'नवते'चे आश्वासनही जाणवते.

'नव्या शतकाचे' (पृ. २) हार्दिक स्वागत कवी आपल्या कवितेच्या उंबरठ्यावर करतो.

'समस्त मानवतेची मंगलमय स्वप्ने घेऊन' नव्या शतकाने यावे असे कवी म्हणतो. 'भौतिक क्रांती आणि मानवी शांती हातात हात गुंफून चालावी आणि विश्वाच्या उरात सलणारा विफलतेचा काटा जळून खाक व्हावा' असे जेव्हा कवी म्हणतो, तेव्हा त्याची व्यापक मानवतावादी भूमिकाही आपल्याला जाणवते. 'नव्या शतका'चे आगमन 'शुभंकर' असावे असे कवीला वाटते.

जगत्पुरिया यांनी 'कविते'विषयी आपली भूमिका एका कवितेत स्पष्ट केली आहे (पृ. ३). कवितेच्या अंतर्बाह्य स्वरूपाचे समग्रत्व त्यात प्रतिबिंबित झाले आहे. कविता ही विविधरूप धारिणी असते. पण शेवटी ती 'विश्वाचा शोध घेणारी, मानवतेचा बोध देणारी आणि अभिव्यक्तीचा मोद' देणारी. (पृ. ४) असते. 'कवी हा आविष्काराच्या विस्तीर्ण प्रदेशात चकाकणारा तारा असतो.' आणि चकाकणारा तारा अंधारात चाचपडणाऱ्यांना प्रकाशाची वाट दाखवतो. हे लक्षात घेतले म्हणजे 'ठिणगी' या संग्रहातील कविता कशा उद्‌बोधक आहेत हेही लक्षात येते.

जगत्पुरिया यांची कविता शोषितांना न्याय मिळवून देण्यासाठी अनिवार्य संघर्षाची कविता आहे (पृ. १४). परिवर्तनाचा पायाच भरणारी कविता आहे. (पृ. १५) विझलेल्या नेत्रांत आशा पेरणारा हा कवी आहे (पृ. १९). त्याने 'भीममंत्र' ग्रहण केलेला आहे. आणि 'भीमपक्षाच्या कैवाऱ्यांना' तो या मंत्राचे भान ठेवायला सांगतो.

'तेजस्वी विचारांनी एक नवा इतिहास घडविणाऱ्या' युगनायकाला (डॉ. आंबेडकर) हा कवी अभिवादन करतो. तितक्यात मनःपूर्वकपणे तो 'युगंधर श्रमनायका'लाही वंदन करतो. (पृ. १२). श्रमिकाला हे नायकत्व कार्लमार्क्सने बहाल केले म्हणून काय झाले ? 'भीममंत्र' ग्रहण करूनही श्रमनायकाशी असणारे आपले अतूट नाते हा कवी विसरत नाही. खरी कविता कोणत्याही 'वादा' (ism) तले सत्त्व ग्रहण करते. पण त्या वादाच्या तपशिलात अडकून बसत नाही. म्हणून ती बेगडी होत नाही. डी.बी. जगत्पुरिया यांची कविता म्हणूनच मला खरी कविता वाटते.

*'श्रमनायक विश्वाचा*<br>
*गाडा ओढत आहे*<br>
*माणसाच्या मनासकट*<br>
*एकसंध भूमीचं विभाजन*<br>
*करणाऱ्या देशांना अदृश्य*<br>
*श्रमबंधाने जोडत आहे.' (पृ. १२)*

या वैश्विक नात्याचे आकलन कवीला झाल्याची ही साक्ष आहे.

*'तूच राबतो भूक घेऊनी*<br>
*तूच गाळतो घाम*

*तुझ्या श्रमाने जागा होतो*
*माणसातला राम !'*

असे श्रमिकाविषयीचे गौरवोद्‌गार कवी काढतो.

या कवीच्या कवितेत 'काशी', 'पंढरी', 'चंद्रभागा', 'राम' इत्यादी शब्द येतात म्हणून गोंधळून जायचे काही कारण नाही. अशा शब्दांचे एका विवक्षित संस्कृतीशी साहचर्य आहे हे खरे. परंतु शेवटी हे शब्द आहेत. त्या शब्दांच्या अर्थातही परिवर्तन होत असते. यथावकाश त्यांचे साधारणीकरण होते अथवा त्यांना लाक्षणिक अर्थ प्राप्त होतो. आपला विद्रोह आपल्यावर अन्याय करणाऱ्या संस्कृतीशी व तिच्या समर्थकांशी असतो. शब्दांशी नव्हे. यथावकाश राम या शब्दाला माणसातले सत्त्व असाच लाक्षणिक अर्थ प्राप्त झाला आहे. श्रमिकाच्या श्रमाने माणसाच्या सत्त्वाची जाणीव होते. हेच जगतपुरिया यांना सांगायचे आहे. माणसाचे सत्त्व म्हणजेच माणसाचे माणूसपण हा त्यांच्या कविमनाचा चिंतनविषय आहे. 'माणूस : काही नोंदी' या कवितेत कवीने माणसाचा सत्त्वार्थच शोधण्याचा प्रयत्न केला आहे. माणूस म्हणजे नेमके काय? सॉक्रेटिसने आपल्या शिष्यांशी संवाद करताना हाच मूलभूत प्रश्न त्यांच्यापुढे ठेवला होता. 'What is man? What can man become?' माणसाच्या काही नोंदी केल्यानंतर शेवटी कवी म्हणतो–

*'क्वचितच माणूस-*
*देवाहून मोठा*
*संतत्वाचा साठा*
*क्षमेहून शुद्ध*
*करुणेचा बुद्ध !'*

शोषितांना न्याय मिळवून देण्यासाठी संघर्ष आणि लढा उभारण्याचे आवाहन करणारा हा कवी एकीकडे चिंतनाच्या तात्त्विक पातळीवर माणसाचे माणूसपण शोधण्याचा प्रयत्न करतो हे मला अतिशय महत्त्वाचे वाटते.

*'भीम युद्धात दिसला*
*भीम बुद्धात हासला*
*रंग भीमाच्या नीतीचा*
*मीही कपाळी फासला' (पृ. ६०)*

असे कवी म्हणतो ते यथार्थच आहे. डॉ. आंबेडकरांनीच संघर्ष करायला शिकवले, डॉ. आंबेडकरांनीच बुद्धाची करुणा शिकविली आणि डॉ. आंबेडकरांनीच धम्माची शिकवण देऊन जगण्याची नीती शिकविली. विद्रोहाची, बंडाची, परिवर्तनाची भाषा बोलणारा हा कवी समग्र मानवाकडे बुद्धाच्या करुणेने पाहतो आणि भीमाने शिकविलेल्या नीतीचा मार्ग दाखवतो.







सामाजिक न्याय मिळत नाही, नीतीची प्रस्थापना होत नाही, संघर्ष करावाच लागतो कारण आज मानवी जीवनाच्या सर्वच व्यवहारांवर राजकारणाची सत्ता आहे. आणि राजकारणग्रस्त सत्ता सगळीच भ्रष्ट, स्वार्थी, आपमतलबी झाली आहे. 'अस्तित्वच कणाहीन झालेले आहे आणि या कणाहीन अस्तित्वाला लाळघोटी, लुडवूड, चमचेगिरी अन् खुशमस्करी हे चार खांदेकरी लाभले आहेत.' (पृ.५९)

*'रावणाच्या हाती । रामाचा तो हात*
*वाट्याचीच बात । अंधारात ॥' (पृ. ११)*

राम आणि रावण यांची हातमिळवणी झाली आहे. आणि अंधारात लाभाची वाटणी करून घेत आहेत, या उपरोधातले वास्तवसत्य जितके परखड आणि उघड आहे, तितकेच 'प्रत्येक पीडित भारतीय जिवंत असूनही स्वर्गवासी आहे,' (पृ. १६) या उपरोधातले वास्तव्यसत्य भेदक आहे. आणि त्याहीपेक्षा–

*'माणुसकीच्या म्लान तीरावर*
*अन् करुणेचे पडे कलेवर*
*हाय चेतना अपंग झाली*
*मानवतेचा अखंड ओसर!*
*शुष्कपणाचे अपंग ओझे*
*आता जाहले भार धरेवर*
*स्वस्त जाहला मानव इथला*
*श्वास जयाचा अंत्य समेवर!' (पृ. ६३)*

ही वास्तवानुभूती माणसालाच अगतिक करणारी आहे. राजकारणाच्या अधिसत्तेमुळे निर्माण झालेल्या वास्तवाचे विविध दर्शन जगतपुरिया यांनी उपहास, उपरोध, विडंबन यांच्या आधारे त्रुटित काव्यरचनेतून घडविले आहे. या राजकीय उपरोधिकांत (Political Satire) त्यांच्या प्रतिभेचा, कल्पकतेचा आणि शब्दप्रभुत्वाचा प्रभाव अधिक प्रत्ययाला येतो.

*हा नेता ताठ कण्याचा*
*दिल्लीहून वाकून आला*
*अब्रूचे ताट मुक्याने*
*सोग्याने झाकून आला' (पृ. २९)*

आजच्या तथाकथित नेत्याचे हे शब्दचित्र किती ठसठशीत आहे,

*गदारोळ गोंधळ*
*आरडाओरड, आदळआपट*
*यालाच म्हणतात*
*जागृत लोकप्रतिनिधींची*

*कार्यक्षम विधानसभा*
*प्रत्येकाच्या खिशात*
*पंचवार्षीय गोंधळ*
*घालण्याची मुक्त मुभा :*
*सत्ताधाऱ्यांना चरायला*
*सवता प्रशस्त सुभा ! !'*

हे भाष्य किती अर्थपूर्ण आहे !

'लोकशाहीचे भजन गाणारे– भक्तिभावाने गाणारे राजकीय फड उभे आहेत. . . त्यांच्या ओठांत एक आत निराळं आहे. (राजकीय फडाचा) तमाशा जनता पाहत आहे.' (पृ. ४७) हे रोखठोक वास्तव वाचकांना सुन्न करून टाकणारे आहे.

हे सगळे वास्तव बदलण्यासाठी परिवर्तनवादी भूमिका स्वीकारणं अनिवार्य आहे. जगत्पुरिया यांच्या कवितेने ही भूमिका स्वीकारली आहे. म्हणूनच ते म्हणतात-

*'चल दोस्ताऽऽ*
*परिवर्तनाचा पाया भरला की*
*इथे न्यायाचा पाऊस पडेल*
*तुझ्या निर्णायक हातांनीच*
*आता नवे महाभारत घडेल ! (पृ. १५)*

सामाजिक आशयाच्या विचारप्लुत कविता, राजकीय विषयावरील उपरोधिका, एकच एक प्रभावी विचार अथवा भावना व्यक्त करणाऱ्या लहान कविता (चार ओळींच्या) अथवा 'चाटूक्ती' (Epigram) अशा विविधतेबरोबरच 'चांदणं', 'सपान' यांसारख्या भावकविताही जगत्पुरिया यांच्या प्रस्तुत कवितासंग्रहात आढळतात.

रचनेची विविधता हे त्यांच्या कवितासंग्रहाचे आणखी एक वैशिष्ट्य आहे. मुक्तरचना, आठ अक्षरी, नऊ अक्षरी लवचिक छंदबद्धरचना, पारंपरिक ओवी रचनाबद्ध, क्वचित लावणीला अनुरूप असा अंतर्गत लय असलेला द्रुतगती रचनाबंध, गझल अशी विविधता लक्षणीय आहे. आशयाला अनुरूप अशी त्यांची काव्यरचना असते. या कवीचे शब्दांवर प्रभुत्व निश्चितच आहे. आशयाचा नेमका आणि नेटका आविष्कार करणारे शब्द कवी सहजपणे योजतो. 'माझे शब्द' या शीर्षकाची एक कविताच संग्रहात आहे. आवश्यकतेनुरूप त्यांचे शब्द 'जालीम इंधन' बनतात, 'पायासाठी वंदन' करणारे बनतात, तर कधी 'अभिनंदनासाठी नम्र' होतात (पृ. ५) आणि 'व्यवस्थेच्या उन्मत्त डोक्यात हाणायला शब्द घण बनतात.' (पृ. २१)

भाषिक अंगाने जगत्पुरिया यांच्या कवितांचा स्वतंत्रपणे विचार करता येईल. परंतु अल्पाक्षरत्व, लवचिकपणा आणि संयुक्तिकता हे त्यांच्या काव्याच्या भाषेचे प्रमुख वैशिष्ट्य

आहे. मात्र अनुप्रास आणि यमकयोग्य शब्दांचा मोह कवीने टाळायला हवा. अनुप्रासयुक्त शब्दयोजनेमुळे कवितेत अंतर्गत अशी स्वाभाविक लय निर्माण होऊ शकते (उदाहरणार्थ 'घाव' ही कविता) परंतु सयमक शब्दांच्या मोहाने कवितेत नुसतीच कारागिरी निर्माण होऊन कविता कृत्रिम अथवा अस्वाभाविकही होऊ लागते. (उदाहरणार्थ 'एखंड' ही कविता) हे भान कवीने ठेवायला हवे.

'ठिणगी' या कवितासंग्रहामुळे आजच्या परिवर्तनवादी कवितेत अन्वर्थक भर पडली. काव्यरसिक या संग्रहाचे स्वागतच करतील.

(ठिणगी (कविता संग्रह) : डी. बी. जगतपुरिया, संगर प्रकाशन, धुळे. मूल्य तीस रुपये.)
(१०९, जयप्रकाश नगर, गोरेगाव (पूर्व), मुंबई ४०० ०६३ चैतन्य)

---

डॉ. कल्याण काळे

# भागवतपुराण आणि ज्ञानेश्वरी यांच्यांतील साम्यशोध

मराठी संत वाङ्मयाच्या क्षेत्रात आता काही नवीन संशोधनाला वाव राहिला नाही. जे काही लिहिलं जातंय ते मागचे दोन ग्रंथ पाहून तिसरा ग्रंथ या स्वरूपाचं असतं, असं एक मत हल्ली मांडलं जात असतं. पण ही संपूर्ण वस्तुस्थिती नव्हे. आजही वरील परिस्थितीला अपवाद ठरतील असे काही अभ्यासक आणि त्यांचं संशोधन दृष्टीस पडतं. श्री. रा. शं. नगरकर यांचं 'भागवतमहापुराण आणि ज्ञानेश्वरी' हे नवं पुस्तक वरील मत मांडणाऱ्यांना चांगलंच उत्तर आहे.

मध्ययुगीन मराठी वाङ्मयाच्या अभ्यासकांना श्री. नगरकरांचं नाव नवं नाही. ते मध्ययुगीन मराठी वाङ्मयाचे साक्षेपी अभ्यासक आहेत. 'ज्ञानेश्वर' त्रैमासिकाचे ते काही काळ संपादक होते. सामराजकृत 'रुक्मिणीहरण', केसोबासकृत 'दृष्टान्तपाठ' या ग्रंथांचं त्यांनी संपादन केलेलं आहे. अगदी अलीकडे 'संतसाहित्य : अभ्यासाच्या काही दिशा' डॉ. मु. श्री. कानडे गौरवग्रंथाचं त्यांनी सहकार्याने संपादन केलं आहे. भारतीय संस्कृतिकोशात त्यांनी बरीच वर्षं सहसंपादक म्हणून काम केलं आहे. अधूनमधून त्यांचं संशोधनपर स्फुट लेखनही चालू असतं. यावरून त्यांचा मध्ययुगीन मराठी वाङ्मयाच्या क्षेत्रातील अधिकार स्पष्ट होतो.

नगरकर हे वृत्तीने संशोधक आहेत. त्यामुळे चाकोरीबद्ध वर्तमानपत्री लेखनापासून ते चार हात दूर असतात. सतत काहीतरी नवीन शोध घेण्याची त्यांची धडपड असते.












ज्ञानेश्वरीची पाठचिकित्सा, ज्ञानेश्वरांच्या अभंगांची पाठचिकित्सा, संतवाङ्मयाचे सुभाषित कोश, पुराणांचे विविधांगी अभ्यास हे त्यांचे आवडीचे विषय असून या सर्व क्षेत्रांत त्यांचं संशोधनकार्य चालू आहे. प्रस्तुतचा ग्रंथ म्हणजे त्यांच्या बव्हंगी व्यासंगाचं एक फळ होय.

कृष्णोपासक अशा सर्व पंथांमध्ये भागवत पुराण आणि भगवद्गीता हे दोन ग्रंथ सारखेच लोकप्रिय आहेत. या दोन्हीही ग्रंथांचा विचारव्यूह जवळजवळ एकच आहे. त्यातील भक्तीच्या उदार तत्त्वज्ञानामुळे ते द्वैती अद्वैती दोन्ही संप्रदायांमध्ये सारखेच आदरणीय ठरले आहेत. ज्ञानेश्वरी ही गीतेवरचीच टीका असल्याने याच विचारव्यूहात तिचा समावेश करायला हरकत नाही.

एकाच विचारव्यूहातले दोन ग्रंथ निवडून त्यांच्या परस्परसंबंधाचा शोध घेण्यात नगरकरांनी काही नवीन सिद्ध केलं आहे असं नाही. ज्ञानेश्वरीवर भागवताचा प्रभाव आहे हे त्यांनी नव्याने दाखवून दिलं आहे असं नाही. त्यांच्यापूर्वी ल. रा. पांगारकर आणि न. र. फाटक यांनी स्पष्टपणे ते सांगितलेलं आहे. पण त्यांचं सांगणं हे केवळ दिशामात्र होतं. नगरकरांनी त्या सूत्राचा पाठपुरावा करून सर्व पुराव्यांचा ढीग उपसून त्यांची एक व्यवस्था लावून जी या प्रभावाची मांडणी केली आहे ती नवी आहे, यात संशय नाही. म्हणूनच या ग्रंथाचं स्वागत करणं उचित ठरेल.

ज्ञानेश्वरीची स्वतंत्रता स्वतःसिद्ध आहे. त्या पार्श्वभूमीवर ज्ञानेश्वरीवरील पूर्वसूरींचा प्रभाव लक्ष वेधून घेणारा आहे. विवेचनाच्या ओघात ज्ञानेश्वर पूर्वसूरींच्या वचनांचे संदर्भ देत जातात. ते पाहता ज्ञानेश्वरीची संदर्भसमृद्धी डोळ्यात भरते. या पूर्वसूरींच्या ऋणाची चर्चा करणं म्हणजे ज्ञानेश्वरांच्या स्वतंत्र प्रज्ञेची उणीव सांगणं नव्हे. उलट त्यांच्या व्यक्तिमत्वाची घडण उलगडून दाखवण्याचं ते एक साधन ठरतं. त्यातून त्यांच्या विद्वत्तेवर प्रकाश पडतो. त्यांची उपयोजनक्षमता लक्षात येते. आणि ते ज्या विचारव्यूहात वावरले तो व्यूहही स्पष्ट होतो.

नगरकरांनी भागवताशी असलेले ज्ञानेश्वरीचे अनुबंध स्पष्ट करताना सहा प्रकरणांमध्ये त्यांची मांडणी केली आहे. पहिल्या 'व्यासंग' या प्रकरणात ज्ञानेश्वरांवरील पूर्वसूरींच्या प्रभावांचा अभ्यास करणाऱ्या अनेक अभ्यासकांची मतं उद्धृत केली आहेत. ही सर्व इतस्ततः विखुरलेली मतं एकत्रितपणे पाहायला मिळणं हे या प्रकरणाचं वैशिष्ट्य आहे. त्या अभ्यासकांपैकी कोणी वैदिक वाङ्मयाशी, कोणी उपनिषदांशी, कोणी शंकराचार्यांशी, कोणी योगवासिष्ठाशी, तर कोणी महाभारताशी ज्ञानेश्वरीची जवळीक दाखवण्याचा प्रयत्न केला आहे.

पुढच्या पाच प्रकरणांमध्ये दृष्टान्त, कथा, विचारप्रभाव, विचारसाम्य आणि शैली या सूत्रांच्या अनुरोधाने भागवताचे ज्ञानेश्वरीशी असलेले अनुबंध स्पष्ट केले आहेत. त्यामध्ये 'दृष्टान्तां'चा अभ्यास करताना नगरकरांनी प्रथम भागवतातील दृष्टान्तांचा अभ्यास केला आहे. भागवतात एकूण ४०३ दृष्टान्त त्यांना आढळले. त्यांची ज्ञानेश्वरीशी तुलना करता

एकूण ९२ दृष्टान्तांचं ज्ञानेश्वरीतील दृष्टान्तांशी साम्य असलेलं त्यांना आढळलं. ज्ञानेश्वरांना हे दृष्टान्त अन्य ग्रंथांतूनही सुचले असण्याची शक्यता लक्षात घेऊन ते भागवतावरूनच स्फुरले असावेत हे सिद्ध करण्यासाठी काही सूत्रंही त्यांनी निश्चित केली. दृष्टान्तांची भाषा, त्यांचा संदर्भ यांच्या आधाराने हे सिद्ध करता येतं. याच्याच जोडीला त्यांनी आणखी एक आधार मदतीला घेतला आहे. बहिरा जातवेद या ग्रंथकाराने भागवताच्या दशम स्कंधावर 'भैरवी' या नावाची टीका लिहिली आहे. तो भागवतातील दृष्टान्त आपल्या विवेचनात वापरतो. हा बहिरा जातवेद ज्ञानेश्वरांच्या काळात होऊन गेला असं नगरकर मानतात. आणि ज्ञानेश्वरांनी बहिरा जातवेदाचंही ऋण घेतलेलं आहे असं मानतात. त्यामुळे बहिरा जातवेदाच्या माध्यमामुळे भागवतातील दृष्टान्त ज्ञानेश्वरीत आलेले आहेत असं त्यांनी दाखवून दिलेलं आहे. हे त्यांचं तिसरं सूत्र मात्र आज स्वीकारता येत नाही. कारण बहिरा जातवेद हा कवी उत्तरकालीन म्हणजे १४७० इ.स.च्या सुमारासचा आहे, हे त्या टीकेचे साक्षेपी संपादक डॉ. कोपरकर यांनीच सिद्ध केलेलं आहे. हे सूत्र सोडलं तरी नगरकरांचं दृष्टान्त साम्यासंबंधीचं विवेचन बाधित होत नाही. दृष्टान्तांसंबंधीचं हे ५४ पानांचं प्रकरण त्यांच्या पुस्तकातील सर्वांत मोठं प्रकरण आहे.

यानंतरच्या प्रकरणात ज्ञानेश्वरीत आलेल्या कथासंदर्भांचे मूलस्रोत निश्चित करण्याचा त्यांनी प्रयत्न केला आहे. ज्ञानेश्वरीच्या संपादकांनी आणि कोशकारांनी यापूर्वी असे प्रयत्न थोडेफार केले आहेत, पण त्यात चिकित्सेपेक्षा वाचकांची तात्पुरती गरज भागवण्याचाच हेतू दिसतो. नगरकरांनी या कथा इतर पुराणांत कोठेकोठे आल्या आहेत याचा शोध घेऊन, ज्ञानेश्वरांनी मात्र भागवत पुराणावरूनच त्या घेतल्या असाव्यात असा निष्कर्ष काढला आहे. उदा. अजामिळाची कथा भागवतात आढळते, तशीच पद्मपुराणातही आढळते. पण पद्मपुराणाचा तो भाग ज्ञानेश्वरांच्या उत्तरकालीन असल्यामुळे ज्ञानेश्वरांचा आधार भागवतकथाच आहे, असा निष्कर्ष ते काढतात. सुदाम्याची कथा कृष्णकथा सांगणाऱ्या हरिवंश, विष्णुपुराण, अग्निपुराण, ब्रह्मपुराण, देवीभागवत या ग्रंथांत आढळत नाही. ती फक्त भागवत आणि पद्मपुराणात आढळते. पण अजामिळाच्या कथेप्रमाणेच ती ज्ञानेश्वरांनी भागवतावरूनच घेतल्याचं निष्पन्न होतं. यावरून नगरकरांचा हा तौलनिक अभ्यास केवळ या दोन ग्रंथांच्या अभ्यासापुरताच मर्यादित नसून त्याला एक व्यापक बैठक आहे हे लक्षात येईल. याच प्रकारे ध्रुव, गजेंद्रमोक्ष, भस्मासुर, पूतना इ. कथांचा शोध त्यांनी घेतला आहे. भस्मासुर कथेच्या संदर्भात नगरकर सांगतात की, संपूर्ण पुराणवाङ्मयात भस्मासुर हे नाव कोठेच आढळत नाही. हे नाव फक्त मराठी साहित्यातच आढळतं. पुराणग्रंथांत कालपृष्ठ महादानव आणि वृकासुर यांच्या कथा भस्मासुराच्या कथेसारख्या आढळतात. इतर तपशिलांच्या आधाराने नगरकरांनी ज्ञानेश्वरांच्या भस्मासुरकथेचा उगम भागवतातील वृकासुर कथाच असल्याचं सिद्ध केलं आहे.










यानंतरच्या 'विचारप्रभाव' या प्रकरणात दोन्ही ग्रंथांतील वैचारिक साम्याचा विचार केला आहे. 'म्हणोनि भक्ति गा एथ सरे। जाति अप्रमाण॥' ह्या ज्ञानेश्वरीतील विचाराशी साम्य असलेले विचार भागवत आणि ब्रह्मवैवर्तपुराण यातही आढळतात. पण ब्रह्मवैवर्त पुराण उत्तरकालीन आहे. म्हणून तो विचार ज्ञानेश्वरांना भागवतावरूनच स्फुरला असावा असं ते मानतात. त्याला अन्य उपोद्बलक कारणंही आहेत. भागवतात प्रल्हादाच्या तोंडी हा विचार येतो. ज्ञानेश्वरांना प्रल्हादाच्या संदर्भातच हा विचार सुचतो, आणि या विचाराभोवतालचा सर्व संदर्भ भागवतातील संदर्भाशी जुळतो. या दोन मुद्द्यांवर त्या विचाराचा स्रोत भागवत पुराणच आहे असं ठरतं. याच प्रकारांनी 'नग्न स्त्रीला वस्त्र नेसविल्याखेरीज तिच्याकडे पाहू नये' या ज्ञानेश्वरीतील विचाराचा उगम भागवतातील देवयानी-ययाती कथेत त्यांना दिसतो. भक्तीच्या विविध प्रकारांमध्ये विरोधी भक्तीचाही समावेश होतो. ज्ञानेश्वरांनी त्या संदर्भात शिशुपालाच्या विरोधी भक्तीचा उल्लेख केला आहे. भागवतातही विरोधी भक्तीच्या संदर्भात शिशुपालाचाच उल्लेख आलेला आहे. त्यावरून ज्ञानेश्वरीतील विरोधी भक्तीचं विवेचन भागवतप्रेरित आहे हे ठरतं. याच संदर्भात नगरकरांनी अध्यात्मरामायणात भागवताचं अनुकरण करून रावणाच्या विरोधी भक्तीचं कसं विवेचन येतं हे दाखवलं आहे.

विचारप्रभाव हा आत्मसात केलेल्या विचारांच्या संदर्भात जाणवणारा प्रकार आहे. विचारसाम्य हे त्यामानानं जास्त प्रकट असतं. शब्दयोजना, आशय यांचं ते भाषांतरच असतं असं मानायला हरकत नाही. नगरकरांनी एका स्वतंत्र प्रकरणात ते दाखवायचा प्रयत्न केला आहे. ते वाचताना पसायदानातील 'जे का खळांची व्यंकटी सांडो' या चरणाचं मूळ भागवतातील 'स्वस्त्यस्तु विश्वस्य खलः प्रसीदतां' या चरणात आहे हे वाचून नवीन भान येतं.

'शैली' या प्रकरणात भागवताच्या विवेचनशैलीचाही प्रभाव ज्ञानेश्वरीवर कसा पडला आहे हे शब्दांची पुनरुक्ती, पुनरुक्तीच्या साह्याने साधलेली अतिशयोक्ती इ.च्या विवेचनाने पटवून दिलं आहे. शैलीबद्दलचं हे विवेचन बरंच वरवरचं वाटतं. त्याचा शोध अधिक खोलात जाऊन करायला हवा होता.

या सर्व अभ्यासाचं स्वरूप पाहिल्यावर तो किती बारकाईनं केलेला आहे हे लक्षात येतं. एखाद्या छोट्याशा प्रमेयाच्या सिद्धीसाठी सर्व पुराणग्रंथांचा धांडोळा घेण्याची जी मानसिक तयारी नगरकरांनी दाखविली आहे ती विलक्षण आहे. पदवीसाठी संशोधन करणाऱ्या आजच्या एम.फिल. पीएच. डी.च्या विद्यार्थ्यांसाठी नगरकरांनी या पुस्तकाच्या रूपाने वस्तुपाठच सादर केला आहे असं म्हणायला हरकत नाही. संशोधनातील परिश्रम घेण्याची तयारी, चिकाटी आणि शिस्त यासाठी नगरकरांचा हा साम्यशोध खूपच मोलाचा मानावा लागेल.

(भागवतपुराण आणि ज्ञानेश्वरी, रा. शं. नगरकर, सुविद्या प्रकाशन, पुणे ३०/पृ. १२० मूल्य ६० रुपये.)
(मराठी विभाग, पुणे विद्यापीठ, पुणे ४११ ००७.)



अनुक्रमणिका

# महाराष्ट्र साहित्य परिषद



## कार्यवृत्त : जानेवारी-मार्च १९९४

**१८ जानेवारी–** कै. वि.द. घाटे स्मृतिदिनानिमित्त डॉ. प्र. चिं. शेजवलकर यांचे 'शिक्षणक्षेत्र– विनाअनुदानाच्या समस्या' या विषयावर भाषण झाले.

**१९ जानेवारी–** कै. चिं. वि. जोशी स्मृतिदिनानिमित्त मराठीतील उत्कृष्ट विनोदी पुस्तकाच्या लेखकास व प्रकाशकास प्रतिवर्षी दिले जाणारे कॉन्टिनेंटल पुरस्कृत चिं. वि. जोशी पारितोषिक श्री. भा.ल. महाबळ यांना 'नवरा बनवावा तसा बनतो' या त्यांच्या सुयोग प्रकाशनातर्फे प्रकाशित झालेल्या पुस्तकास सुप्रसिद्ध हास्यचित्रकार श्री. शि.द. फडणीस यांच्या हस्ते देण्यात आले. परीक्षकांतर्फे श्री. श्रीनिवास भणगे यांनी पुस्तकाविषयी अभिप्राय व्यक्त केला.

**२१ जानेवारी–** माधवराव पटवर्धन ऊर्फ माधव जुलियन यांच्या जन्मशताब्दीनिमित्त श्री. गोपीनाथ तळवळकर यांच्या अध्यक्षतेखाली एक विशेष कार्यक्रम सादर करण्यात आला. डॉ. अश्विनी धोंगडे यांचे या प्रसंगी माधव जुलियन यांच्या कवितेविषयी भाषण झाले. या प्रसंगी श्री. मो. ज्ञा शहाणे, स.कृ. पाध्ये, कॅप्टन दिनकर पटवर्धन, डॉ. द.न. गोखले



अनुक्रमणिका







आणि डॉ. सु. रा. चुनेकर यांचा सत्कार करण्यात आला.

**१८ फेब्रुवारी–** 'उमलते अंकुर' या नवोदित कवी/कवयित्रींच्या मासिक साखळी कार्यक्रमात डॉ. संगीता बर्वे यांनी आपल्या कविता सादर केल्या. डॉ. म. वि. गोखले आणि रवींद्र भट यांनी या कवितांविषयी आपले मनोगत व्यक्त केले.

**२८ फेब्रुवारी–** कॉन्टिनेंटल पुरस्कृत कवी कुसुमाग्रज पारितोषिक श्रीमती रजनी परुळेकर यांच्या 'स्वीकार' या कवितासंग्रहाला श्री. ना. सं. इनामदार यांच्या हस्ते देण्यात आले.

**९ मार्च–** महाराष्ट्र साहित्य परिषदेतर्फे दरवर्षी दिला जाणारा महाराष्ट्रकवी यशवंत पुरस्कार श्री. फ. मुं. शिंदे यांच्या 'निरंतर' या काव्यसंग्रहाला कविवर्य वि. म. कुलकर्णी यांच्या हस्ते देण्यात आला.

**१९ मार्च–** लायन्स क्लब डाऊन टाऊन/मिडटाऊन आणि महाराष्ट्र साहित्य परिषद यांच्या संयुक्त विद्यमाने युवकांसाठी कै. बा. सी. मर्ढेकर स्मृतिदिनानिमित्त एक कविसंमेलन आयोजित करण्यात आले. डॉ. गं. ना. जोगळेकर आणि रवींद्र भट यांनी मर्ढेकरांच्या कवितेतील नव्या प्रवाहांची युवकयुवतींना ओळख करून दिली.

**२९ मार्च–** थोर इतिहासकार कै. शं. ना. जोशी यांच्या स्मृतिनिमित्त त्यांच्या कुटुंबियांच्याकडून देण्यात आलेल्या निधीतून रु. ५०००/- चे रोख पारितोषिक या वर्षी श्री. अरुण सारथी यांना 'भारतीय लोकशाही : शोध आणि बोध' या त्यांच्या वैचारिक पुस्तकाबद्दल श्री. वि. स. वाळिंबे यांच्या हस्ते देण्यात आले.

**रवींद्र भट**
कार्यवाह.

# शाखावृत्त

**धुळे**

**२० डिसेंबर :** शहादा महाविद्यालयाचे हिंदी विभाग प्रमुख डॉ. विश्वास पाटील यांचे 'साहित्याची प्रेरणा' या विषयावर भाषण झाले. कार्यक्रमाच्या अध्यक्षस्थानी प्रा. प्र. दा. दलाल होते. पाहुण्यांचे स्वागत व प्रास्ताविक प्रा. भगवान ठाकूर यांनी केले.

**२४ जानेवारी :** येथील निष्णात धन्वंतरी तथा कवी कै. भाऊसाहेब देशपांडे यांच्या स्मृतिदिनानिमित्त खुली काव्यवाचन स्पर्धा घेण्यात आली. या वेळी प्रमुख पाहुणे म्हणून श्री. राजा महाजन उपस्थित होते. अध्यक्षस्थानी प्राचार्य सदाशिवराव माळी होते.

स्पर्धेमध्ये ५३ कवींनी भाग घेतला. यांत जळगाव व धुळे जिल्ह्यांतील कवींचा समावेश होता. श्रीमती सुमतीबाई देशपांडे यांच्या हस्ते स्पर्धक कवींचा सत्कार करण्यात आला.

समारंभाच्या पूर्वार्धात धुळे येथील श्रमिक भगवान अहिरे यांच्या 'उन्हाळा' या









कवितासंग्रहाचे प्रकाशन राजा महाजन यांच्या हस्ते झाले.

परिचय कार्याध्यक्ष डी.बी. जगत्पुरिया यांनी करून दिला. सूत्रसंचालन प्रा. भगवान ठाकूर यांनी केले. कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी प्रा. बी. बी. महाजन, प्रा. सौ. राजश्री शेलकर, प्रा. पु. म. चित्ते, प्रा. सौ. उषा पाटील, प्रा.लीला देवरे, हि. रा. चौधरी, सुभाष अहिरे यांनी विशेष परिश्रम घेतले. कै. डॉ. भाऊ देशपांडे यांच्या दुबईस्थित कन्या सौ. मोनिका रवींद्र गवांदे यांनी म.सा.प. धुळे जिल्हा शाखेस पाच हजार रुपयांची विनाअट देणगी दिली. त्या देणगीच्या व्याजातून ही स्पर्धा घेण्यात आली.

**२० मार्च :** कविवर्य कै. मर्ढेकरांच्या स्मृतीला अभिवादन करण्यासाठी डॉ. एस. एस. भोसले यांचे 'ग्रामीण साहित्य आणि दलित साहित्य' या विषयावर भाषण झाले. या वेळी ज्येष्ठ पत्रकार श्री. कुमार केतकर प्रमुख पाहुणे म्हणून उपस्थित होते. अध्यक्षस्थान कविवर्य प्रा. पुरुषोत्तम पाटील यांनी भूषविले.

या वेळी मराठी साहित्याला पुस्तक संख्येच्या प्रमाणात वाचक नसल्याची खंत कुमार केतकर यांनी आपल्या भाषणात व्यक्त केली.

डॉ. एस. एस. भोसले यांनी आपल्या भाषणातून बहुसंख्य ग्रामीण साहित्यिक वास्तवतेला सामोरे जाण्याऐवजी कलावादाचाच पुरस्कार करतात असे सांगितले.

प्रास्ताविक व परिचय कार्याध्यक्ष डी.बी. जगत्पुरिया यांनी करून दिला. सूत्रसंचालन प्रा. भगवान ठाकूर यांनी केले. आभार प्रा. पुं. म. चित्ते यांनी मानले. कार्यक्रमास प्राचार्य मा. य. वैद्य, डॉ. रा. भ. चौधरी, प्रा. डॉ. श्रीपाल सबनीस, रावसाहेब गरुड यांच्यासह अनेक मान्यवर उपस्थित होते. कार्यक्रम यशस्वी करण्यासाठी हि. रा. चौधरी, एस.बी. रावळे, श्री. प्रदीप शुक्ल यांनी सहकार्य केले.

महाराष्ट्र साहित्य परिषद धुळे शाखेतर्फे या वर्षी प्रथमा परीक्षेचा उपक्रम यशस्वीपणे राबविण्यात आला. शहरातील विविध शाळांतील एकूण २९६ विद्यार्थी या परीक्षेला बसले. परीक्षेसाठी प्रा. बी. बी. महाजन, प्रा. सौ. राजश्री शेलकर, पी. यू. पवार यांनी विशेष परिश्रम घेऊन परिषदेला मोलाचे सहकार्य केले.

**डी. बी. जगत्पुरिया, कार्याध्यक्ष**

**डोंबिवली**

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या डोंबिवली शाखेने टिळकनगर विद्यामंदिरात २० मार्च रोजी बा.सी. मर्ढेकर स्मृतिदिन शाखेच्या उपाध्यक्षा सौ. स्मिता तळेकर यांच्या अध्यक्षतेखाली आयोजित केला होता.

मर्ढेकरांच्या कवितेवरील चर्चेची सुरुवात सौ. विनीता ऐनापुरे यांनी केली. त्यांनी मराठी कवितेतील बदलांचे टप्पे (कालखंड) सांगत कै. मर्ढेकरांनी कवितेत आणलेला











वेगळेपणा दाखवून दिला.

समारोप प्रा. प्रकाश परब यांनी केला. त्यांनी आपल्या विवेचनात कै. मर्ढेकरांबाबत मराठी मनावर आदरयुक्त दहशत असल्याचे सांगितले. मर्ढेकरांच्यावर प्रारंभी जरी रविकिरण मंडळाचा प्रभाव दिसला, तरी 'शिशिरागम' पासून 'आणखी काही कविता'पर्यंतच्या कवितेत झालेले बदल हेच त्यांचे युगप्रवर्तकत्व सिद्ध करते, हे त्यांनी कवितांच्या संदर्भासह विशद केले. युद्धाच्या पडसादाने व यंत्रयुगामुळे माणूस माणूसपण हरवून बसला. सर्व माणसे बिनचेहऱ्याची दिसू लागली. जग लहान भासू लागले. यांमुळे मर्ढेकरांच्या संवेदनशील मनाला ज्या वेदना झाल्या त्याचे प्रतिबिंब त्यांच्या कवितेत दिसते. माणसाला उंदराची उपमाही त्यामुळेच दिली असावी. मर्ढेकरांची शब्दकळा वैशिष्ट्यपूर्ण आहे. त्यांना आपल्या कवितेतून जो आशय मांडायचा होता तो रूढ सांकेतिक भाषेतून व्यक्त झाला नसता, याकरिता त्यांनी भाषेची वेगळी मोडणी केली. छंद, ओवी, वृत्ते यांचाही उपयोग त्यांनी कवितेत केला. एक समीक्षक म्हणूनही त्यांचे महत्त्व साहित्याचा आढावा घेताना कोणालाही विसरता येणार नाही, असे ते म्हणाले.

डॉ. प्रल्हाद देशपांडे यांनीही मर्ढेकरांची कविता व त्यानंतरची कविता यावर विचार मांडले. सभासदांनी काही निवडक कवितांचे वाचन केले. शाखेचे कार्याध्यक्ष श्री. रवींद्र आवटी यांनी आभार मानले.

मधुकर देशपांडे, कार्यवाह

**श्रीरामपूर**

महाराष्ट्र साहित्य परिषदेच्या प्रथमा, प्रवेश व प्राज्ञ ह्या परीक्षांना येथील केंद्रातून अनुक्रमे १०३, ४८ व ६९ इतके परीक्षार्थी प्रत्यक्षात बसले होते. ८ व ९ जानेवारी रोजी ह्या परीक्षा व्यवस्थितपणे घेण्यात आल्या. त्यासाठी केंद्राधिकारी म्हणून सौ. मीनाताई जगधने ह्यांनी काम पाहिले. त्यांना प्रामुख्याने डॉ. अविनाश वि. कांबळे, सौ. मंगलाताई काजळे व प्रा. ब. ह. विलायते यांनी सहकार्य केले. तसेच येथील बोरावके महाविद्यालयाचे प्राचार्य वि. गो. कसबेकर ह्यांचे मार्गदर्शन उपयुक्त ठरले.

म.फुले जयंतीनिमित्त येथील रा. ब. नारायणराव बोरावके महाविद्यालयाचे पदव्युत्तर अध्ययन केंद्र व श्रीरामपूर शाखा ह्यांच्या संयुक्त विद्यमाने श्री. हरी नरके ह्यांचे व्याख्यान ९ एप्रिल रोजी घेण्यात आले. विषय होता 'म. फुले : व्यक्ती, वाङ्मय व कार्य' अध्यक्षस्थानी श्रीरामपूरचे नगराध्यक्ष श्री. जयंतराव ससाणे होते, तर प्रमुख अतिथी म्हणून रयत शिक्षण संस्थेचे व्हाईस चेअरमन श्री. रावसाहेब शिंदे होते. प्रारंभी प्राचार्य वि. गो. कसबेकर ह्यांनी सर्वांचे स्वागत करून व्याख्यानामागील भूमिका स्पष्ट केली, तर शेवटी प्रा. ब. ह. विलायते ह्यांनी सर्वांचे आभार मानले.

जानेवारीमध्ये पणजी (गोवा) येथे साजऱ्या झालेल्या अ. भा. मराठी साहित्य संमेलनाचे अध्यक्ष प्राचार्य राम शेवाळकर ह्यांचे एका कार्यक्रमानिमित्ताने श्रीरामपूर येथे १६ एप्रिल रोजी आगमन झाले. त्या वेळी शाखेच्या वतीने पुष्पहार घालून डॉ. अविनाश वि. कांबळे ह्यांनी मा. शेवाळकर ह्यांचे स्वागत केले.

**डॉ. अविनाश कांबळे, सौ. मीनाताई जगधने**
कार्यवाह

**कल्याण**

येथील ख्यातनाम विनोदी लेखक श्री. वि. आ. बुवा यांचा शंभराव्या पुस्तकाच्या प्रकाशनाच्या निमित्ताने श्री. नकुल पाटील यांच्या अध्यक्षतेखाली २१ नोव्हेंबर रोजी सत्कार करण्यात आला. त्याच वेळेस त्यांची प्रकट मुलाखत घेण्यात आली.

वि. आ. बुवांची मुलाखत सौ. विनीता ऐनापुरे, किरण जोगळेकर व भालचंद्र रेडे यांनी घेतली. श्री. गिरीश लटके यांनी आभार मानले व सूत्रसंचालन पद्माकर कुलकर्णी यांनी केले.

दुसरा कार्यक्रम दि. २७ फेब्रुवारी रोजी झाला. सुप्रसिद्ध कवी श्री. म. पां. भावे यांच्या विडंबन गीतांचा स्वरबद्ध कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता.

कल्याण शाखेचे सहकार्यवाह किरण जोगळेकर यांनी पाहुण्यांचा परिचय करून दिला. उपाध्यक्ष क.ह. देशपांडे यांचे हस्ते कलाकारांना गुलाबपुष्पे देण्यात आली. प्रवीण देशमुख यांनी आभार मानले. सूत्र संचालन पद्माकर कुलकर्णी यांनी केले.

**भालचंद्र रेडे, कार्याध्यक्ष**

**वाई**

२ मार्च रोजी कै. पिलाजीराव फडणीस स्मृती व्याख्यान म्हणून डॉ. गं. ना. जोगळेकर यांचे 'कवी गिरीश– व्यक्ती व काव्य' या विषयावर व्याख्यान झाले. कवी गिरीश यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने हा कार्यक्रम आयोजित करण्यात आला होता.

३ मार्च रोजी डॉ. सौ. नीलम हातेकर यांचे 'माधव ज्युलियन यांची कविता' या विषयावर व्याख्यान झाले. हा कार्यक्रम माधव ज्युलियन यांच्या जन्मशताब्दीच्या निमित्ताने आयोजित करण्यात आला होता.

येथील लो. टिळक स्मारक संस्था, महाराष्ट्र साहित्य परिषदेची संलग्न संस्था असल्याने या संस्थेतर्फे चालविल्या जाणाऱ्या वसंत व्याख्यानमाला मंडळातर्फे महाराष्ट्रातील सार्वजनिक व्याख्यानमालांच्या संयोजकांची एक परिषद वाई येथे ६ मे रोजी आयोजित करण्यात आली होती.

**मधु नेने, विजयकुमार फरांदे**
कार्यवाह










# महाराष्ट्र साहित्य परिषद

## नवे आजीव सदस्य (जानेवारी-मार्च १९९४)

(पुणे)

सौ. जोशी आशा दिलीप, सौ. पानसरे वासंती जयंत, डॉ. जोशी मुकुंद लक्ष्मण, सौ. कुलकर्णी शैलजा दिलीप, सौ. शिंदे मीरा अरुण, डॉ. महाडिक काकासाहेब रामू, श्री. जोशी वसंत विश्वनाथ, श्री. किर्लोस्कर अरुण, श्री. किणीकर शशिकांत, श्री. केळकर मोरेश्वर वामन, सौ. केंजळे नंदिनी उदय, श्री. बरन कुबेरसिंह ठाकुरसिंह, श्री. देशपांडे मधुकर मुरलीधर, श्री. कुलकर्णी सीताराम बाळकृष्ण, श्री. ढवळे माधव विष्णू, श्री. सोनटक्के पद्माकर दिगंबर, श्री. खानवलेकर विनायक शंकर, श्री. बोडस मोरेश्वर विष्णू, श्री. शहा शांतीलाल राजाराम, श्री. आगळे सिद्धार्थ रामचंद्र, परळीकर वैजयंती मधुकर, टकले मृणाल रामचंद्र, बोडस कालिंदी मोरेश्वर.

(अन्य ठिकाणचे)

पुजारी श्रीकांत सिद्दाप्पा (बेळगाव), डॉ. सौ. सहस्रबुद्धे अचला वि. (जबलपूर म प्र.) टकले गिरीश सदाशिव (नाशिक), मा. मुख्याध्यापिका, डॉ. सी. एम. मेहता कन्या विद्यामंदिर (कोपरगाव), मा. प्राचार्य के.जे. सोमय्या कॉलेज (कोपरगाव), डॉ. डी. एस. मुळे (कोपरगाव), डॉ. जोशी प्रदीप के. (जळगाव) कु. चौधरी सुभद्रा भटू (धुळे), प्रा. बोरसे अशोकराव वेडूजी (धुळे), श्रीमती मोगलाईकर शैलजा नंदी (धुळे), प्रा. सौ. घोगरे मनीषा हरीष (धुळे), श्री. भामरे नरेंद्र लक्ष्मण (धुळे), खरोटे संजय जनार्दन (कल्याण), बागडे रतन भिलाजी (कल्याण), डोमाडे अर्जुन भीमा (ठाणे), कु. कुलकर्णी मंजुषा मोहन (कल्याण), बर्वे श्रीहरी श. (कल्याण), सौ. टुमणे अमिता अजित (कल्याण), सौ. वैद्य अपर्णा भा. (कल्याण), कोरान्ने नीलकंठ वि. (कल्याण), संत गंगाधर विष्णू (कल्याण), डॉ. सौ. जोग सुप्रिया हरी (दादर), नाशिककर महेंद्र रामेश्वर (कल्याण), जाधव धनाजी अनाजी (डोंबिवली), रडे माधवराव रोहिदास (कल्याण), महामुलकर शिवाजी हैबतराव (कल्याण), डॉ. फडके सुरेश यशवंत (कल्याण), पांडे संदीप बाळकृष्ण (कल्याण), काणे दिलीप गजानन (कल्याण), लेले उल्हास वसंत (कल्याण), भालेराव सुरेश मोरेश्वर (कल्याण), गोखले विनायक मोरेश्वर (कल्याण), वाघ भटू नागो (मु.पो. अंजूर, जि. ठाणे), सौ. बेदरकर सुनंदा किरण (कल्याण), फडके विश्वनाथ अनंत (कल्याण), तामडे हेमंत रामनाथ (कल्याण), पै सीताराम आनंदराव (कल्याण), ठाकूर सोमसिंग चंद्रसिंग (कल्याण), डॉ. सौ. परांजपे विजया प्रकाश (कल्याण), पानसरे दीपाली अंबादास (कल्याण), सौ. कुलकर्णी माधवी माधव (कल्याण), गोखले विद्यादेवी बाळकृष्ण (कल्याण), पटवर्धन मनोहर नारायण (कल्याण), भावे सुरेश घनश्याम (कल्याण), सौ. गोसावी वैशाली विजय (कल्याण), केळकर प्रभाकर गजानन (कल्याण), सौ. चिटणीस अपर्णा शामकांत (कल्याण), शुक्ल प्रभाकर रघुनाथ (कल्याण), शिधोरे










काशिनाथ प्रभाकर (कल्याण), डॉ. कुलकर्णी नवीन विश्वास (कल्याण), डॉ. वेलणकर राहुल नारायण (कल्याण), देशपांडे गणेश लक्ष्मण (कल्याण), डॉ. सौ. गाडगीळ विद्या मोहन (कल्याण), सौ. कर्वे शुभदा अनंत (कल्याण), कुलकर्णी उमेश दत्तात्रय (कल्याण), जोशी पराग वामन (कल्याण), सौ. नाईक सुप्रिया हरीप (कल्याण), तिबिले अनंत दत्तात्रय (कोल्हापूर), कवठेकर शरद श्रीकृष्ण (डोंबिवली), डॉ. पाब्रेकर प्रमोद नथुराम (डोंबिवली), देसाई भरत भगवान (डोंबिवली), देशपांडे सुरेश चिंतामण (डोंबिवली), घांगरेकर मोहन रामचंद्र (डोंबिवली), विंझे अरविंद नारायण (डोंबिवली), सौ. छेडा ललिता मुळचंद (डोंबिवली), सौ. टेंबे संध्या अरुण (डोंबिवली), सौ. नवरे गीता शशिकांत (डोंबिवली), सौ. कुलकर्णी अभया जनार्दन (डोंबिवली), वाडेकर रमेश नरहर (डोंबिवली), सौ. महाजन सुनंदा चंद्रकांत (डोंबिवली),

श्री. गोसावी प्रदीप विश्राम (डोंबिवली), सौ. भट्ट सरोज सुरेश (डोंबिवली), श्री. मंत्री राजेंद्र रमेश (मुंबई), सौ. मराठे गीता चिंतामणी (ठाणे), श्री. कामत बाळाजी विष्णू (ठाणे), सौ. कुंटे सरोजिनी अशोक (ठाणे), श्री. बडगंची विठ्ठल हणमंतु (सोलापूर), श्री. उपाध्ये सदाशिव शरच्चंद्र (कल्याण), श्री. अय्यर भास्कर वैद्यनाथन् (कल्याण), श्री. वनकुद्रे अवधूत बाबूराव (कल्याण), सौ. भिडे सुमंगला नीळकंठ (कल्याण), श्री. जोशी प्रकाश एकनाथ (कल्याण), श्री. सिंगासने जयवंत कानू (कल्याण), श्री. काळे किसनराव भागोजीराव (दौंड पुणे), सौ. जोशी सुधा प्रभाकर (घाटकोपर), श्री. कुलकर्णी रामचंद्र बापूजी (डोंबिवली), प्रा. गायकवाड शुक्राचार्य वाळू (डोंबिवली)

(बदलापूर)

सौ. करमरकर श्रुती संजय, नानल वंदना श्रीकृष्ण, सौ. देशपांडे स्मिता दत्तात्रय, वादवणे प्रमोद नामदेव, आपटे पद्मनाथ पुरुषोत्तम, साठे सुरेश वामन, वैद्य यशवंत विष्णू, बल्लाळ वसंत प्रभाकर, गोरे मेघःशाम शिवराम, डॉ. करमरकर मोहन गणेश जोशी संतोष प्रभाकर, जोशी भार्गव शिवराम, चुरी रघुनंदन यादव, शिंदे प्रकाश गजानन, डॉ. भोगावकर प्रमोद रघुनाथ, बापट अरुंण दामोदर, दीक्षित दिनेश रामचंद्र, ओक अविनाश भार्गवराम आपटे अविनाश वैजनाथ, शुक्ल हेमंत जगन्नाथ, कुलकर्णी सतीश शंकर, वाणी बापूसाहेब जगन्नाथ, सौ. मांजरेकर चित्रा शरद प्रा. नामजोशी वसंत काशिनाथ, चौधरी दत्तात्रय काशिनाथ, फणसे सुबोध दत्तात्रय, चक्रदेव वृषाली सं., आगाशे भास्कर धोंडोपंत, आलुर सविता सुरेश, उबली शिरीष परशुराम, काटदरे दीपक अच्युत गोळे आशिष वामन, सौ. गुप्ते जयश्री पांडुरंग, जोशी प्रसाद मधुकर, सौ. जोशी स्वाती मुकुंद, प्रा. डॉ. जोशी अनघा उपेंद्र सौ. जोशी कविता दिलीप, सौ. काळे दीपाली अविनाश, श्री. काळे अविनाश सदाशिव, सौ. शेटे स्मिता रामचंद्र, बाविस्कर पंढरीनाथ भागो, श्री. देशपांडे प्रकाश बाळकृष्ण, श्री. व्याससमुद्र श्रीकांत राघवेंद्र, देशमुख रामकृष्ण दत्तात्रय, बडवे राहुल विठ्ठल, कुलकर्णी विजय म्हाळसाकांत, पंडित संजय गजानन, शिदीड मुकुंद भास्कर, कडू रघुनंदन भालचंद्र, कुलकर्णी अविनाश गणेश.



अनुक्रमणिका








